॥ श्री ॥

# विविधज्ञानविस्तार

आणि

## महाराष्ट्र–साहित्य–पत्रिका.

वर्ष ५१ ] सप्टेंबर १९२०. [ अंक ९.



वा. व. ३ रुपये. ] १८–१०–१९२० [ फुटकळ अंक ६ आणे.






अनुक्रमणिका




नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे.
ख्यातकीर्त ग्रंथसंग्राहक, संशोधक, संपादक आणि समीक्षक डॉ. स. गं. मालशे ह्यांच्या संग्रहातील जुन्या नियतकालिकांचे काही अंक संगणकीकरण करून अभ्यासकांना उपलब्ध व्हावेत ह्यासाठी त्यांच्या कन्या डॉ. सुषमा पौडवाल ह्यांनी राज्य मराठी विकास संस्थेला उपलब्ध करून दिले आहेत.
ह्या ग्रंथांच्या/ नियतकालिकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना आपण खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१) सदर ग्रंथांच्या/ नियतकालिकांच्या पीडीएफ प्रती ह्या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२) सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३) पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्थेची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४) आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी ह्या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.
वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून ह्या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. ह्यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था ह्यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.




अनुक्रमणिका

# पोंच आणि अभिप्राय.

१. मधुराणी--डा. रवींद्रनाथ टागोर यांच्या एका बंगाली कादंबरीच्या इंग्रजी भाषांतरावरून हें मराठी रूपांतर रा. रा. शिवराम गोविंद भावे, पेण, यांनीं केलें. रवींद्रनाथांचें मूळ कथानक त्यांच्या इतर लेखांप्रमाणें गूढात्मक, मनोरंजक आणि बोधप्रद आहे; आणि रा. भावे-कृत त्याचें रूपांतरही, अलस्वल्प भाषा दोष वगळतां, बरेंचसें गोड उतरलें आहे. अलीकडील मालांतील पानचट गोष्टी वाचण्यापेक्षां प्रस्तुतसारख्या कादंबरीचें वाचन कथाप्रिय स्त्रियांस आणि मुलींस जास्त फलप्रद होईल. या सुंदर कादंबरीची छपाई आणि बांधणीही अंतर्बाह्य दृष्टिमनोहर आहे. किंमतही बेताचीच-म्हणजे २ रुपये आहे. पुस्तकें मुंबईत, गिरगांवांत 'सद्य प्रकाशक मंडळी'कडे मिळतील.

२. कै. लोकमान्यांचा सुरस पोवाडा--लेखक तिलकदास, इंदूर. पृ. १६. किं. २ आणे. प्रकाशक, वारुणे आणि मंडळी, तोफखाना, इंदूर. तिलक-भक्तीस्तव एकवेळ वाचण्याजोगा आहे.

३. छत्रपती--हें मासिक कोल्हापुरास आगष्टपासून निघूं लागलें आहे. डेमी अष्टपत्री सांचा. पृ. ४०. वा. व. २ रुपये. कोल्हापुरांत अलीकडे मागसलेल्या वर्गीच्या उन्नत्यर्थ जी चळवळ झपाट्यानें चालली आहे, तीस हातभार लावण्यासाठींच या मासिकाचा जन्म झालेला दिसतो. फलद्रूप होवो, असें इच्छितों.

४. चैतन्य--हें वर्तमानपत्र बेळगांव येथें रा. रा. मोरो बळवंत मराठे बी. ए. एल्. एल्. बी. यांनीं गेल्या आगष्टपासून सुरू केलें आहे. नवीन इंडिया ॲक्टामुळें, हिंदुस्थानच्या राजकीय स्थितींत जो फरक पडला आहे, त्याचें लोकांस यथार्थ ज्ञान करून देण्यासाठींच रा. मराठे यांचा हा प्रयत्न दिसतो. रा. मराठे यांनीं कै. मंगेश शिवाजी तेलंग यांच्या साहचर्यांत, आणि नंतरही, वृत्तपत्राच्या संपादकाच्या बाबतींत जो अनुभव मिळविला आहे, तो प्रस्तुत प्रसंगीं त्यांस फार उपयोगी पडेल. 'चैतन्या'पासून त्याच्या वाचकांस योग्य ज्ञान मिळून तें चिरायु होवो, असें इच्छितों. वा. व. पोस्टेजसह ४ रुपये.

५ दुनिया--हें साप्ताहिक पुणें येथें गेल्या जूनपासून निघूं लागलें आहे. वा. व. ३०१३ "आचार्यकल्पसारख्या मूर्खांना" (१२।९।२०) असली भाषा बरी दिसत नाहीं.

गहिणी-विद्या-शाला. प्रथम वार्षिक अहवाल. ही विद्याशाला कोल्हापुर येथें स्थापन झाली आहे. "जुलै महिन्यांत मराठी बाजूस पांच व इंग्रजी बाजूस तीन, याप्रमाणें ८ मुली शाळेंत येऊं लागल्या." ही स्थिति विशेष प्रोत्साहक नाहीं, हें उघड आहे. शाळेस जोडून एक वाचनालयही आहे, आणि स्त्रियांसाठीं मधून मधून व्याख्यानेंही करण्यांत येतात. कोल्हापुरांतील स्त्रीशिक्षणेच्छु जनांनीं या संस्थेचा कां फायदा करून घेऊं नये हें समजत नाहीं.

७. न्यू सारस्वत युनियनचा सातवा वार्षिक अहवाल. व्याख्यानें देणें, संमेलनें भरविणें, रात्रींची शाळा चालविणें, युनियनचे सभासदांस व इतरांस रुग्णशुश्रूषेस लागणारें सामान पुरविणें, वाचनालय आणि कोऑपरेटिव क्रेडिट सोसायटी चालविणें, इत्यादि उपयुक्त कामें करण्याचें, अत्यल्प प्रमाणावर कां होईना, मंडळानें पत्करिलें आहे. तरुण मंडळीचें हें करणें इतरांस निःसंशय अनुकरणार्ह आणि सजातीयांकडून आश्रयपात्र आहे.

८. क्षित्तेभंडारी ऐक्यवर्धक मंडळीचा तिसावा रिपोर्ट. या मंडळीची गंगाजळी पाहतां तिचें काम उत्साहानें चाललें आहे असें दिसतें. भंडारी ज्ञातीच्या विद्यावृद्धीसाठीं संस्थेचे प्रयत्न स्तुतीस पात्र आहेत. जातींतील होतकरू विद्यार्थ्यांस शिष्यवृत्या, वार्षिक बक्षिसें सढळ हातानें दिलीं जातात.

९. मुंबई प्रायमरी टीचर्स असोशिएशनचा चवदावा वार्षिक रिपोर्ट. मुंबई म्युनिसिपल शाळांतील शिक्षक-शिक्षकिणींनीं आपल्या उन्नत्यर्थ संघशक्तीनें चालविलेले प्रयत्न स्तुत्यर्ह आहेत. सुसंघटित प्रयत्नांनीं आणि स्कूलकमिटीच्या सहानुभूतीनें त्यांची स्थिति आजला पूर्वीपेक्षां कितीतरी सुधारली आहे. आणि तींत अझूनही सुधारणा होईल, अशी आम्हांस आशा आहे. मात्र "अति सर्वत्र वर्जयेत्" या बोधवचनाकडे दुर्लक्ष होऊं नये, अशी अध्यापक-वर्गास आमची सूचना आहे.




अनुक्रमणिका

महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका.

वर्ष ८ ] त्रैमासिक [ अंक ३



# कवि भास व तद्रचित नाटकें.*

[ रा. रा. पांडुरंग वामन काणे, एम्. ए, एल्एल्. एम्. ]

त्रिवेंद्रम येथील पंडित गणपतिशास्त्री यांनीं भासाचीं म्हणून तेरा नाटकें प्रसिद्ध केलीं आहेत. पुढें आलेलीं तेरा नाटकें निर्विवादपणें भासाचीं ठरतील तर आम्हांला फार आनन्द होईल. परंतु, अजूनपर्यंत पुढें आलेला पुरावा अगदीं अपुरा आहे, असें आमचें मत आहे. तीं भासाचीं म्हणून प्रतिपादन करणाऱ्या गणपतिशास्त्र्यांचा कोटिक्रम असा आहेः हस्तलिखित प्रतींत 'स्वप्नवासवदत्ता' असें एका नाटकाला म्हटलें आहे. प्रसिद्ध झालेलीं तेरा नाटकें अनेक पुराव्यांवरून एकाच ग्रंथकाराचीं आहेत. म्हणून जर 'स्वप्नवासवदत्ता' हें भासाचें ठरेल तर तेराही नाटकें भासाचीं म्हणून ठरतील. 'स्वप्नवासवदत्ता' म्हणून नाटक भासानें लिहिलें होतें असें राजशेखर कवीचें वचन 'सूक्तिमुक्तावलीं'त आहे.[1] म्हणून स्वप्नवासदत्ता व तत्सदृश दुसरीं बारा नाटकें भासाचींच मानलीं पाहिजेत.

या विधानाला उपोद्घलक म्हणून त्यांनीं जीं प्रमाणें दिलीं आहेत तीं हीं नाटकें भासाचीं आहेत असें म्हणणारांनाही सर्वच मान्य होणार नाहींत. त्यांचा मुख्य भर हर्षचरितांत भासाचे नाटकांना 'सूत्रधारकृतारम्भैः' असें जें विशेषण लाविलें आहे त्यावर आहे. तेरा नाटकांत 'नान्द्यन्ते ततः प्रविशति सूत्रधारः' असे शब्द आहेत,व नान्दीचे म्हणून स्वतंत्र श्लोक नाहींत. म्हणून हें वर्णन याच नाटकांना फक्त लागू पडतें. शाकुन्तल, उत्तररामचरित, इत्यादि नाटकांत प्रथम नांदी व नंतर 'नान्द्यन्ते सूत्रधारः' असे शब्द असतात.आमचे मतानें ह्या मुद्द्यांत कांहीं अर्थ नाहीं. हर्षचरितांत नाटकांची देवळांशीं तुलना करावयाची होती, म्हणून द्व्यर्थी 'सूत्रधारकृतारम्भ' हा शब्द वापरला आहे. शाकुन्तलादि नाटकेंही 'सूत्रधारकृतारम्भ' आहेत. भासाच्या नाटकांचें वैशिष्ट्य म्हणून त्या शब्दानें सांगितलेलें नाहीं. वामनाचे काव्यालंकारांतील जीं तीन अवतरणें दिलीं आहेत, व जीं भासाचे नाटकांतून घेतलीं आहेत असें गणपतिशास्त्री म्हणतात, त्यांपैकीं 'यासां बलिः' हें मृच्छकटिकांतून घेतलें असेल. कारण 'द्यूतं हि नाम पुरुषस्यासिंहासनं राज्यं' हें मृच्छकटिकांतील वाक्य वामनानें (४-३-२३) उद्धृत केलें आहे; 'चारुदत्त' नाटकांतूनच घेतलें असें म्हणण्याला आधार नाहीं. 'यो भर्तृपिण्डस्य कृते न युध्येत्' हा चरण कौटिल्यअर्थशास्त्रां-

* 'रा. ऊर्ध्वरेषे यांनीं संपादिलेलें 'पंचरात्रं' हें नाटक आमचेकडे अभिप्रायासाठीं आलें त्यावेळीं आम्हांला विद्धिर्न्यात्...सांप्र्ड चर्चेत साह्य करणारे आमचे मित्र रा. काणे यांस आम्ही पुढें आलेली भासाचींच नाटकें आहेत किंवा नाहींत याबद्दल आपलें मत प्रदर्शित करण्याविषयीं विनंती केल्यावरून त्यांनीं हा लेख लिहिला आहे. —संपादक.

१ भासनाटकचक्रेऽपि छेकैः क्षिप्ते परीक्षितुम् ।
स्वप्नवासवदत्तस्य दाहकोऽभून्न पावकः ॥






अनुक्रमणिका

तून घेतला असेल. तो प्रतिज्ञायौगन्धरायणांतूनच घेतला असें म्हणण्याला पुरावा नाहीं. आतां 'शरच्छशाङ्कगौरेण' एवढा एकच श्लोक राहिला. पण इतक्यावरून हल्लीं प्रसिद्ध झालेलें नाटक (स्वप्नवासवदत्ता) भासाचेंच आहे असें सिद्ध होत नाहीं. वामन इ. स. ८०० च्या सुमारास झाला. म्हणून तत्पूर्वीं दुसऱ्या कोणींही हल्लीं उपलब्ध असलेलें स्वप्नवासवदत्तानाटक लिहिलें असेल तर वामनाचे ग्रंथांत त्यांतून अवतरण येऊं शकेल. आम्हीं इतकें कदाचित् कबूल करूं कीं, हल्लीं प्रसिद्ध झालेलीं तेरा नाटकें एका ग्रन्थकाराचीं आहेत. वाद आहे तो तीं भासाचीं आहेत कीं नाहींत याबद्दल. हीं नाटकें जुनीं आहेत इतक्यावरून तीं भासाचीं आहेत असें सिद्ध होणार नाहीं. तीं फार जुनीं नाहींत असेंही दिसतें. जुनेपणाचा म्हणून पुरावा दिला आहे त्यांपैकीं, प्रस्तावनेच्या ऐवजीं 'स्थापना' ह्या शब्दाचा उपयोग, हा एक आहे. परंतु ह्या नाटककाराला प्रस्तावना हा पारिभाषिक शब्द माहीत होता, हें त्याच्याच दूतघटोत्कचनाटकांतील 'लोकप्रयाविरत-नाटक-तन्त्रवस्तु-प्रस्तावन-प्रतिसमापनसूत्रधारः' ह्या श्लोकार्धावरून स्पष्ट दिसतें. 'लिम्पतीव तमोगानि' हा श्लोक मृच्छकटिकांत, दण्डीचे काव्यादर्शांत व चारुदत्त आणि बालचरित ह्या नाटकांत येतो. पण त्यावरून चारुदत्त हें नाटक आधींचें असें म्हणतां येत नाहीं.अन्य प्रमाणांनीं चारुदत्ताचें पूर्वत्व निर्विवाद प्रस्थापित झाल्यावर असें म्हणतां येईल.

भामहाचे काव्यालंकारांतील 'हतोनेन मम भ्राता मम पुत्रः पिता मम' हे शब्द प्रतिज्ञायौगन्धरायण नाटकांतील 'अणेण मम भादा हदो अणेण मम पिदा अणेण मम सुदो' (अंक १) ह्या वाक्याला उल्लेखून लिहिले आहेत असें म्हणण्यांत अर्थ नाहीं. मूळ पैशाची भाषेंतील बृहत्कथेंतील उदयन व यौगन्धरायणाचे गोष्टीस अनुलक्षून हे शब्द नसतील म्हणवत नाहीं. भामहाला कालिदासाचे पूर्वी ओढण्याचा प्रयत्न तर अगदीं हास्यास्पद आहे. भामह हा कालिदासाहून अर्वाचीन असेंच बहुतेक विद्वानांचें मत आहे, व त्याचे ग्रंथांत मेघदूताचाच उल्लेख आहे असें मानण्यांत येतें. 'नवं शरावं सलिलस्य पूर्णं सुसंस्कृतं दर्भकृतोत्तरीयम्। तत् तस्य मा भूद् नरकं च गच्छेद्यो भर्तृपिण्डस्य कृते न युध्येत्' हा कौटिलीय अर्थशास्त्रांत येणारा श्लोक प्रतिज्ञायौगन्धरायणांत (चवथ्या अंकांत) येतो. म्हणून इ. स. पूर्वी चवथ्या शतकांत झालेल्या-कौटिल्यापूर्वीही प्रतिज्ञायौगन्धरायणाचा कर्ता झाला असें पंडित गणपतिशास्त्री यांचें म्हणणें आहे. जोंपर्यंत अन्य प्रमाणांनीं प्रतिज्ञा नाटकाचें पूर्वत्व सिद्ध झालें नाहीं तोंपर्यंत हा सिद्धांत निर्विवाद नाहीं. प्रतिज्ञानाटकांतच कौटिल्यांतून हें अवतरण कशावरून घेतलें नसेल? किंवा दोन्ही ग्रंथांत तिसऱ्याच एखाद्या ग्रंथांतून कशावरून घेतलें नसेल?

येथपर्यंत पंडित गणपतिशास्त्री यांच्या मुख्य मुद्द्यांचें परीक्षण थोडक्यांत केलें. त्यांचे इतर जे मुद्दे आहेत, कीं प्रस्तुत नाटकें फार सोप्या व आर्ष पद्धतीनें लिहिलीं आहेत, त्यांतील भाषासौष्ठव अगदीं पूर्णत्वाला गेलेलें आहे, व त्यांतील कल्पनांची भरारी व प्रतिभा अत्यंत श्रेष्ठदर्जाची आहे, ह्यांबद्दल आमचें म्हणणें असें आहे. प्रथम या नाटकांभटाच्या सत्य असा आरोप केला म्हणजे अर्थात मग तीं दृष्टी फारच उच्चदर्जाचीं वाटूं लागतात, परंतु त्यांच्यावर प्रसिद्ध ग्रंथकर्त्यांचें नांव लादलें नसतें तर तीं दुय्यम प्रतीचीं आहेत असेंच ठरलें असतें. आमचें असें मत आहे कीं, तेरा नाटकांपैकीं कांहीं अगदीं निकृष्ट दर्जाचीं



अनुक्रमणिका

आहेत. कांहीं नाटकांत कल्पना चांगल्या नाहींत व कवित्व बऱ्यापैकीं आहे ही गोष्ट खरी, परंतु सर्व नाटकें शाकुन्तल, उत्तररामचरित, वेणीसंहार, मुद्राराक्षस, मृच्छकटिक, इत्यादि नाटकांपुढें संविधानकचातुर्य, रसपरिपोष, रीतिविशेष, अलंकारविन्यास इत्यादि गुणांत अगदींच फिकीं पडतील. या नाटकांची भाषा फार जुनी व आर्ष आहे हें आम्हांला कबूल नाहीं. केवळ अपाणिनीय प्रयोगांची रेलचेल असली म्हणजे जुनेपणा येत नाहीं. महाकवि कालिदास याच्यासुद्धां ग्रंथांत ' तं पातयां प्रथममास पपात पश्चात् ' असे अपाणिनीय प्रयोग कित्येक आढळतात. म्हणून कालिदास पाणिनीच्या पूर्वींचा ठरत नाहीं. ह्याशिवाय दुसऱ्या कांहीं किरकोळ मुद्दयांचा विचार पुढें येईलच. पंधराव्या शतकांत झालेल्या काश्मीरक जोनराजानें भासाला भासमुनि म्हटलें म्हणून तो आधीं फार प्राचीन ठरत नाहीं. ठरला तरी प्रस्तुत उपलब्ध झालेल्या तेरा नाटकांच्या कर्त्यालाच तो भासमुनि म्हणत आहे, याबद्दल कांहीं पुरावा नाहीं.

आतां हीं नाटकें भासकृत नाहींत हें दाखविणाऱ्या कांहीं गोष्टींचें दिग्दर्शन करितों. तेरा नाटकांपैकीं एकांतही ग्रंथकर्त्याचें नांव आदीं अन्तीं कोठेंही नाहीं. इतकेंच नव्हे तर नाटकांचींही नावें ग्रंथांत नाहींत. तीं हस्तलिखित प्रतीच्या शेवटीं अमुक नाटक समाप्त झालें या शेऱ्यांतच येतात. दुसरी गोष्ट ही, सर्व नाटकें मद्रास इलाख्यांत सांपडलीं आहेत यावरून, दुसऱ्याही कांहीं प्रमाणांवरून, हा कवि त्या बाजूकडचा असावा असें दिसतें. कालिदासालाही ज्याचेबद्दल कौतुक वाटलें, व जो कालिदासाचे कालीं ' प्रथितयशस् ' असा झाला होता, तो भास द्रविड पांड्य इत्यादि दक्षिण देशांकडील नसावा असें वाटतें. कालिदासाला हल्लीं तरी कोणीही विद्वान् इसवीसन ४५० याचे पलीकडे ओढीत नाहीं. त्यापूर्वीं निदान दोनशें चारशें वर्षें भास झाला असला पाहिजे. तरी इतक्या प्राचीन काळीं दक्षिणेकडे कोणी इतका श्रेष्ठ संस्कृत कवि झाला असेल कीं नाहीं याची शंकाच आहे. बाणभट्ट म्हणतो, भासानें नाटकें लिहून यश मिळविलें. चिरन्तन अशा भरतमुनींच्या नाट्यशास्त्रांत नाटक, प्रकरण, भाण इत्यादि दहा रूपकें सांगितलीं आहेत, व त्यांच्या व्याख्या वगैरे दिलेल्या आहेत. त्या सर्व बाणभट्टाला माहीत होत्या. त्यानें कादंबरींत भरताच्या नाट्यशास्त्राचा उल्लेख केला आहे. हल्लीं जीं तेरा नाटकें भासाचीं म्हणून पुढें आलीं आहेत त्यांतील स्वप्नवासवदत्ता, बालचरित, अविमारक, अभिषेक व प्रतिमा यांखेरीज बाकी सर्व ' नाटक ' या संज्ञेला मुळीं लायकच नाहींत. म्हणून बाणानें उल्लेखिलेलीं जीं भासाचीं नाटकें तीं हीं नव्हत. प्रतिज्ञायौगन्धरायणाला स्वतः कवीनेंच प्रकरण म्हटलें आहे. स्वप्नवासवदत्ता, बालचरित, प्रतिज्ञा, पञ्चरात्र, अविमारक व अभिषेक ह्या सहांत भरतवाक्यांत 'राजसिंहाची' प्रशस्ति आहे. हा राजसिंह कोण ह्याबद्दल संशय आहे तथापि तो पाण्डयवंशांतील राजसिंह असावा. पहिला पाण्डय राजसिंह इ. स. ६७५ चे सुमारास झाला. ह्या राजाचे कारकीर्दींत जर हीं तेरा नाटकें लिहिलीं असतील तर कालिदास व बाण यांना स्पृहणीययश झालेल्या भासाचीं तीं नाहींत हें निर्विवाद होईल.

पंडित गणपतिशास्त्री यांचें मत असें आहे कीं राजसिंह म्हणून कोणा व्यक्तीचें नांव नव्हे तर निवळ विशेषण समजावें. पण हें मत आम्हांला ग्राह्य वाटत नाहीं. हीं तेरा नाटकें भासाचीं आहेत म्हणून जीं प्र[illegible] आलेलीं आहेत तीं अगदींच फुसकीं आहे[illegible]; त्यापेक्षां



हीं नाटकें भासाचीं नाहींत असें दाखविणारीं प्रमाणें बलवत्तर आहेत. ध्वन्यालोकलोचनांत अभिनवगुप्तपादाचार्यांनीं ' सञ्चित पक्ष्मकपाटं नयनद्वारं स्वरूपतडनेन ( ? ) । उद्घाट्य सा प्रविष्टा हृदयगृहं मे नृपतनूजा ' हा श्लोक स्वप्नवासवदत्ता नाटकांतील म्हणून दिला आहे. तो हल्लीं उपलब्ध असलेल्या स्वप्नवासवदत्ता नाटकांत नाहीं. ही गोष्ट फार विचार करण्यासारखी आहे. प्रतिज्ञा, पञ्चरात्र, स्वप्नवासवदत्ता इत्यादि नाटकांतील पहिल्या श्लोकांत दोन अर्थ साधण्यासाठीं जी धडपड कवीनें केली आहे, त्यावरून हा कवि श्लेषाला बरेंच महत्त्व आलें होतें अशा कालीं म्हणजे कालिदासानंतर फार उशिरानें झाला, असें म्हणण्याला हरकत नाहीं. अभिषेक नाटकाच्या पांचव्या अंकांत अनुप्रासाची बरीच खटपट केली आहे. उदाहरणार्थ ' समरमुखनिरस्तप्रहस्तनिकुम्भकुम्भकर्णेन्द्रजिद्विकलबलजलधिजनितभयचकितविमुखाः चपलपलायनमनुचितमविरतममरसमराणि जितवतां भवताम्.' अविमारक नाटकांत कौञ्जायनाचे तोंडांत दहादहा बाराबारा पदांचे समास आहेत. इतके मोठे समास कालिदासाचे ग्रंथांत कोठेंही आढळतील कीं नाहीं याची शंका आहे. लांब समास म्हणजे ओजोगुण अशी व्याख्या तयार झाल्यावर हें नाटक रचिलें असावें. प्रतिमा नाटकाच्या पांचव्या अंकांत सांगोपांग वेद, मानवीय धर्मशास्त्र, माहेश्वर योगशास्त्र, बार्हस्पत्य अर्थशास्त्र, मेधातिथीचें न्यायशास्त्र व प्राचेतसाचा श्राद्धकल्प यांचा उल्लेख आहे. मेधातिथि जर प्रसिद्धमनुभाष्यकार असेल तर हीं नाटकें बरींच अर्वाचीन ठरतील. मीमांसा व धर्मशास्त्र यांतील सिद्धांतांना न्याय म्हणतात; म्हणून मेधातिथि म्हणजे मनुभाष्यकार असण्याचा संभव फार आहे. ' मध्यमव्यायो ' या नाटकांत ' यथा नदीनां प्रभवः समुद्रो यथाहुतीनां प्रभवो हुताशः । यथेन्द्रियाणां प्रभवो मनोऽपि तथा प्रभुर्नो भगवानुपेन्द्रः ॥ ' हा शेवटचा श्लोक अश्वघोषाच्या बुद्धचरितांतील ( १३ सर्ग ) ' काष्ठं हि मथ्नन् लभते हुताशं ' ह्या श्लोकाशीं शब्द व अर्थ ह्या दोन बाबतींत मिळतो. ' चारुदत्त ' ह्या नाटकांत फक्त चार अंक आहेत. त्यांतील अनेक श्लोक, विशेषतः त्यांतील नायक व सज्जलक ( मृच्छकटिकांतील शर्विलक ) यांचे श्लोक शब्दशः मृच्छकटिकांत सांपडतात. 'चारुदत्तां'त संविधानक अगदींच थोडें आहे. एकदम विदूषकाचेच भाषणाला सुरवात होते. असल्या भिकार चोपड्यावरून शूद्रकानें आपलें अनेक बाबतींत हृदयंगम झालेलें मृच्छकटिक रचिलें असें पंडित गणपतिशास्त्री यांचें म्हणणें आहे ! ' यत्ने कृते यदि न सिध्यति कोऽत्र दोषः ' हा भर्तृहरीचा प्रसिद्ध चरण अविमारक नाटकांत ( ३-१२ ) येतो. ( बाकीचे तीन निराळे आहेत ). पंडित गणपतिशास्त्री म्हणणार कीं कौटिल्य, कालिदास, अश्वघोष, भर्तृहरि, शूद्रक इत्यादि नामांकित ग्रंथकार चोर आहेत, व ह्या तेरा ग्रंथांचा कर्ता काय तो साव आणि सर्वांत प्राचीन. आम्हांला तर याच्या विपरीत स्थिति वाटते. हे प्रसिद्ध ग्रंथकार जसेच्या तसेच अनेक श्लोक दुसऱ्याकडून घेतील हें असंभाव्य वाटतें. शिवाय ज्याची चोरी करावयाची तो ग्रंथकार पुनः कनिष्ठ दर्जाचे ग्रंथ करणारा, ज्याच्या ग्रंथांपैकीं एकाचा सुद्धां उल्लेख अनेक अलंकार व नाट्यशास्त्रांतरील ग्रंथांत झाला नाहीं, व उपलब्ध असलेल्या सुभाषितसंग्रह ग्रंथांत ज्याच्या श्लोकांपैकीं एकहि श्लोक ग्रंथकार किंवा ग्रंथनाम घेऊन उद्धृत केलेला नाहीं. जल्हणकृत सूक्तिमुक्तावलि, शार्ङ्गधरपद्धति, सुभाषितावलि व सदुक्तिकर्णामृत ह्या चार सुभाषितसंग्रहांत मिळून अकरा पद्यें भासाचीं म्हणून दिलेलीं आहेत



त्यांतील एकही हल्लींच्या तेरा ग्रंथांत मिळत नाहीं. ह्या अकरा पद्यांत दिसून येणारी सरसता, प्रसादगुण, भाषासौष्ठव तेराही ग्रंथांत बिलकुल दिसून येत नाहीं. यांतील कांहीं खालीं दिलीं आहेत.* तेरा नाटकांतील गद्य तर अनेक ठिकाणीं अत्यंत बोजड व क्लिष्टार्थ आहे. पण पद्यें सुद्धां पुष्कळशीं भिकार व कोणी तरी नवीनच अभ्यास करणाऱ्या पण बुद्धिमान् मनुष्यानें लिहिलेलीं भासतात. यावर पंडित गणपतिशास्त्री यांचें उत्तर असें येईल कीं, हे श्लोक या तेरा नाटकांहून निराळ्या अशा भासाच्या नाटकांतील असतील. अशी कल्पनाच करावयाची तर मग कोणताही सिद्धान्त संभाव्य होईल. परंतु तो निर्विवाद म्हणून मानण्याला कोणीही कबूल होणार नाहीं. पुढें आलेल्या तेरा नाटकांतील प्राकृतभाषेचा विचार केला तर ती कालिदासादिकांचे ग्रंथांहून अर्वाचीन दिसते. यावर पण्डित गणपतिशास्त्री यांनीं अशी शक्कल लढविली आहे कीं, मूळ प्राकृत नक्कल करणारांनीं बदलिलें असावें. आधीं या तेरा नाटकांचा प्रचारच नव्हता. तेव्हां त्यांच्या नकला करण्याचें विशेष कारणच पडलें नाहीं. शिवाय नाटकाच्या नकला करणारे प्राकृत बदलण्याइतके विद्वान क्वचित्‌च असतात. शिवाय अन्य प्रमाणांनीं प्राचीनत्व सिद्ध झालें, तरच ह्या कल्पनेवर कांहीं जोर देतां येईल. गणपतिशास्त्री ह्यांनीं हीं तेरा नाटकें भरतनाट्यशास्त्राच्या सुद्धां पूर्वींचीं आहेत असें ध्वनित केलें आहे. परंतु तें अग्राह्य आहे. प्राकृत कोणी व केव्हां बोलावें वगैरे नाट्यशास्त्राचे सिद्धान्त ठरल्यानंतर फार शतकांनीं हीं नाटकें लिहिलीं असेंच म्हणावें लागतें. पंचरात्राच्या दुसऱ्या अंकांत बृहन्नडा विराटराजाला रणाची हकीकत प्राकृत भाषेंत सांगत असतांना राजा म्हणतोः 'ऊर्जितं कर्म संस्कृतमभिधीयताम्.' नाट्यशास्त्रांत नियम आहे कीं पात्रांनीं कार्यमहत्वानुसार आपली नेहमींची भाषा सोडून संस्कृत बोलावें.[1] ह्या नियमाला अनुसरूनच पञ्चरात्रांतील वाक्य आहे. बाणभट्टानें भासाच्या नाटकांचें वर्णन केलें त्यांत तीं 'बहुभूमिक'(पुष्कळ पात्रें ज्यांत आहेत अशीं) व 'सपताक' आहेत असें म्हटलें आहे. पताका म्हणजे 'प्रधान संविधानकाला पोषक असें दुय्यम प्रतीचें वृत्त' असें नाट्यशास्त्रांत सांगितलें आहे.[2] उदाहरणार्थ वेणीसंहारांत भीम-

१ अस्या ललाटे रचिता सखीभिर्विभाव्यते चन्दनपत्रलेखा ।
आपाण्डुरक्षामकपोलभित्तावनङ्गबाणव्रणपट्टिकेव ॥
२ दयिताबाहुपाशस्य कुतोऽयमपरो विधिः ।
जीवयत्यर्पितः कण्ठे मारयत्यपवर्जितः ॥
३ तीक्ष्णं रविस्तपति नीच इवाचिराढ्यः ।
शृङ्गं रुरुस्त्यजति मित्रमिवाकृतज्ञः ॥
तोयं प्रसीदति मुनेरिव चित्तमन्तः ।
कामी दरिद्र इव शोषमुपैति पङ्कः ॥
४ दुःखार्ते मयि दुःखिता भवति या हृष्टे प्रहृष्टा तथा
दीने दैन्यमुपैति रोषपरुषे पथ्यं वचो भाषते ।
कालं वेत्ति कथाः करोति निपुणा मत्संस्तवे रज्यति
भार्या मन्त्रिवरः सखा परिजनः सैका बहुत्वं गता ॥
५ कपोले मार्जारः पय इति कराँल्लेढि शशिनः
(काव्यप्रकाशांत 'कपाले' असा पाठ आहे).
६ दग्धे मनोभवतरौ बाला कुचकुम्भसंभृतैरमृतैः ।
त्रिवलीकृतालवाला जाता रोमावलीवल्ली ॥
७ विरहिवनितावक्त्रौपम्यं बिभर्ति निशापति—
र्गलितविभवस्याज्ञेवाद्य द्युतिर्मसृणा रवेः ।
अभिनववधूरोषस्वादुः करीषतनूनपा—
दसरलजनाश्लेषक्रूरस्तुषारसमीरणः ॥
८ यदपि विबुधैः सिन्धोरन्तः कथंचिदुपार्जितं
तदपि सकलं चारुस्त्रीणां मुखेषु विलोक्यते ।
सुरसुमनसः श्वासामोदे शशी च कपोलयो—
रमृतमधरे तिर्यग्भूते विषं च विलोचने ॥

[1] कार्यतश्चोत्तमादीनां कार्यो भाषाव्यतिक्रमः ।
[2] यद्वृत्तं हि परार्थं स्यात् प्रधानस्योपकारकम् ।
प्रधानवच्च कल्प्येत सा पताकेति कीर्तिता ॥
—नाट्यशास्त्र १९-२३



चरित व शाकुन्तलांत विदूषकचरित. हल्लींच्या तेरा नाटकांत ज्यांना नाटक असें म्हणतां येईल अशीं फक्त पांच आहेत हें वर सांगितलेंच आहे. ह्या पांच नाटकांत एकही नाट्यशास्त्रांत वर्णिलेली पताका नाहीं असें आम्हांला वाटतें. ज्यावेळीं हीं तेरा नाटकें लिहिलीं त्यावेळीं ब्राह्मण व ( बौद्धधर्मीय ) श्रमणक हे दोन परस्परविरुद्ध मानले जात होते हें अविमारक नाटकावरून स्पष्ट दिसतें.[1] त्याचप्रमाणें बुद्धाच्या जातककथांची ग्रंथकाराला माहिती असावी असें स्वप्नवासवदत्ता नाटकांत पांचव्या अंकांत ब्रह्मदत्तराजा व काम्पिल्य नगर यांसबन्धानें विदूषकाचा जो घोंटाळा उडाला आहे त्यावरून दिसतें. या नाटकांच्या कर्त्याला रामायण, नाट्यशास्त्र व योगशास्त्र हीं माहित होतीं हें अविमारकांत दुसऱ्या अंकांत हे तिन्ही शब्द आले आहेत यावरून स्पष्ट होतें. विष्णुपुराणाच्या पांचव्या अंशांत कृष्णचरितांतील ज्या ठळक गोष्टी दिल्या आहेत त्या त्याच अनुक्रमानें बालचरित नाटकांत आल्या आहेत. ह्या नाटकांत, 'तु' 'च' वगैरे शब्द पद्यांतसुद्धां व्यर्थ घातलेले आढळतात, हें एक मोठें व्यंग आहे. उदाहरणार्थ, अविमारकांत 'एवंविधस्य च न मेऽस्ति मनःप्रहर्षः' ( १.२ ) व 'जामातृसम्पत्तिमचिन्तयित्वा पित्रा तु दत्ता स्वमनोऽभिलाषात्' हे श्लोक पाहावे. मध्यमव्यायोगांत एका ब्राह्मणाचें नांव केशवदास म्हणून आलें आहे. जर गणपतिशास्त्री म्हणतात त्याप्रमाणें हीं नाटकें इ. स. पूर्वी पांचव्या सहाव्या शतकांत लिहिलीं असतील तर एखाद्या ब्राह्मणाचें नांव केशवदास असणें असंभाव्य वाटतें. 'शर्मवद् ब्राह्मणस्य स्यात्' हा मनुस्मृतींतील श्लोक प्रसिद्धच आहे.

उपरिनिर्दिष्ट प्रमाणांवरून आमचें असें मत झालें आहे कीं कालिदास व बाण यांना कौतुकविषय झालेला प्रथितयशस् जो भास तत्कृत पुढें आलेलीं तेरा नाटकें नाहींत. ह्या तेरा नाटकांचा कर्ता मध्यम प्रतीचा कवि असून तो इसवी सनाच्या सातव्या आठव्या शतकानंतर झाला असावा. पुढें आलेलीं तेरा नाटकें प्राचीन भासाचींच आहेत असा समज भारतीय व पाश्चात्य विद्वानांपैकीं मोठमोठ्या लोकांचा असल्यामुळें आम्ही आपलें मत भीतभीतच पुढें ठेविलें आहे. परंतु सत्यान्वेषणाचे मार्गांत मोटया धेंडांच्या नांवांची भीड मुळींच उपयोगी नाहीं, म्हणून आपलें मत स्पष्टपणें मांडिलें आहे. हीं नाटकें प्राचीन भासाचीं तर नाहींतच, पण आम्हांला असा बळकट संशय येतो कीं ज्याप्रमाणें अठराव्या शतकाचे अखेरीस एका वंगीय पंडितानें 'दत्तकचन्द्रिका' ग्रंथ आपणंच लिहून प्राचीनकाळीं लिहिलेला म्हणून भासवून कोलब्रूकसारख्या महापण्डिताला चकविलें त्याप्रमाणेंच एखाद्या द्राविड किंवा करलीय पण्डितानें इकडचे तिकडचे तुकडे गोळा करून व कांहीं स्वबुद्धिनिर्मित घालून आपल्या स्वतःचें किंवा एखाद्या राजाचें रंजन करण्यासाठीं तयार केलेली तेरा नाटकांची कन्था अस्सल काश्मीरी शाल असें समजून बरेच पंडित झुलत आहेत.

१ 'यज्ञोपवीतेन ब्राह्मणः चीवरेण रक्तपटः' अंक ५.

* हेंच मत आमचे मित्र रा. रंगाचार्य रड्डी यांनीं विविधज्ञानविस्तारांत (१९१६) 'भास किंवा आभास' या विस्तृत निबन्धांत प्रतिपादिलें आहे. त्यांतील व या निबन्धांतील पुष्कळशीं प्रमाणें एकच आहेत.





अनुक्रमणिका

# लोकमान्यांचें यशोगायन

[ रा. रा. दु० आ० तिवारी. ]

गेला गेला तिलक विजयी राष्ट्रकल्याणकारी !
शैलांच्याही कठिण हृदयीं पाझरे दुःख-वारी !
जागोजागीं रुदन करण्या सोडुनी कीं प्रयागा
आली देवी विमल यमुना पुण्यवंतीहि गंगा ! १

आतां डोळे रडुनि रडुनी आंधळे हाय ! होती
गंगेहूनी अधिकही जरी पाट त्यांचे वहाती,
लाभायाची नच जगतिं ती मूर्ति कोणास केव्हां !
गाण्यासाठीं गुणचि उरले गातसे त्यांस जिव्हा.

जे कुन्दासम लोककर्णयुगुलीं अत्यंत कीं शोभले,
ज्यांनीं दिक्पट आपुल्या नवयशें कोरूनियां ठेविले
नामोच्चार करी यदीय तनुतें आनंदरोमांचिता,
राष्ट्राच्याच ललाटिंचा तिलक जो शोभे तया धन्यता!

तुवां केलें तूझें प्रथित कुल विश्वांत सदया !
तयामध्यें तारोज्ज्वल पुरुष आलेहि उदया;
तरी तेथें तूतें शशिसम असा मी समजतों !
"क्वचित् कोणी प्राणी निजकुल विभूषीत करितो"

ख्रिस्ताचा सन, जन्मकाळ तव जो, नेत्रांपुढें आदरीं;
घेईं त्यांतिल अंक मी, सहज जों बेरीज त्यांची करीं
तों ती वीस भरे; मनांत मजला आश्चर्य वाटे महा-
वीसाव्या शतकांत वीस भरतां त्वन्मृत्यु आला पहा

विद्येची तिलका! सदा तुजवरी होती कृपा जी महा
तेणें सन्मति वाढली; सुमतिनें सत्कर्म वाढे पहा!
कर्में वाढुन पुण्य, सद्यश पुढें पुण्येंच त्या वाढलें!
वाढे त्याच यशें त्वदीय महिमा जेणें जगा मोहिलें!

शब्दीं मोहकता, मनीं विमलता, वृत्तींत शालीनता,
प्रेमीं पूर्ण उदारता, सरलता, लोकांत सन्मानता,
धर्मीं तत्परता, वचीं मधुरता, राष्ट्रीय तेजस्विता,
होते सद्गुण वंदनीय तुझिया एकांत हे सर्वथा !

इ. स. १८५६.

मागायास उशीर, वाण नव्हती द्रव्यादिकांची तया
त्याचे बोल तशी तयार जनता सोत्कंठ वागावया.
नाहीं चंचल जाहला, न शिवली त्यातें अहंभावना.
"ऐश्वर्यांतहि थोर सज्जन कधीं सच्छील सोडीचना."

धैर्यें तुझें हृदय सागरतुल्य होय,
तैसाच सागरहि त्वद्हृदयोपमेय !
होतें तुझें मन मृदू कमलासमान,
तैसेंच तें कमलही हृदयासमान ! ९

चंद्र जैसा चकोरास शांतिप्रद,
सूर्य चंडोल पक्ष्यास कीं सौख्यद,
जेविं मोरास बाष्पार्द्र अंभोधर,
भारतातें तसा **बाळ गंगाधर** ! १०

तुझ्या योगें येई भरतविषयालागिं महती,
तुझीही त्यायोगें महति कळली सर्व जगतीं;
सदा तूं लोकांना भजसि, तुजही लोक भजती;
महत्कीर्तीला तूं समुचित, तुलाही उचित ती ! ११

न सिंहाला मंत्री, मृगपति परी तो म्हणवितो;
प्रधानात्रांचोनी शशि उडुपतीही मिरवितो;
तसा तूंही जाशी विभु म्हणवुनी देवसदनीं.
" स्वयंभूश्रेष्ठांना गुणचि करिती पूज्य भुवनीं."

शत्रूंना गमलास तप्त रविसा, मित्रांस तूं चंद्रसा,
भक्तांना प्रभु राम-सा, रिपुगणा तूं भाससी काळसा;
वाटे कौतुक कीं परस्पर—विरोधाभास हा होतसे!
"ज्याची दृष्टि जशी असेल जगतीं आभास त्याला तसे."

कुणी म्हणति धर्म हा निरत राष्ट्रधर्मीं दिसे;
कुणी म्हणति पार्थ हा अचल सत्प्रतिज्ञा असे;
प्रसाद-कविला गमे रुचिर वाढता इंदु हा !
कितीक तरि काजवे करिति लोकमान्यस्पृहा !




अनुक्रमणिका

कुठें कुंद ! तैसा पयोवृन्द कोठें !
यशाची तुझी चारुता शुभ्र कोठें !
कुठें केतकी ! चंदनी क्षीण गंध !
तुझ्या कीर्तिचा त्याहुनीही सुगंध ! १५

कीर्तीचा तव दुंदुभी जन परद्वीपस्थही ऐकती;
त्यांन्या भूमिंत मान्यता मिळविली जाऊनि तेथें किती !
देवांचा गुरुही बृहस्पति रिझे पाहूनियां तूजसी
विद्वाना ! तुझिया समान जगतीं तूं एकला शोभसी !

वागणें गोड, तैशी कृती गोडही,
आंत बाहेर जो सारखा या महीं,
यत्सदाचार-संपन्नता निर्मला,
यक्ष कीं देव होता कळेना मला ! १७

ती सभाधीटता, भाषणप्रौढता,
शब्दशालीनता, बुद्धिची श्रेष्ठता,
थक्क झाली कितीदां सभा अंतरीं,
भाषणाची कुणा ना तुझी ये सरी ! १८

कृष्णाचा गमलास अंश सकलां तूं बाळकृष्णा महीं;
गीता विस्तृत भारतास कथिली त्वां कर्मयोगी नवी;
शास्त्री पंडित वाग्विलासपटु हे त्वत्कीर्तिगंगांतरीं
क्रीडाया सजती,तटावरिच ही मी स्नानसंध्या करीं !

सद्गुणाचीच तूं खाण लोकोत्तरा !
रत्न एकेक वेंचूं किती सुंदरा !
ठेविली दुर्भिणीची जरी सूक्ष्मता,
पूर्ण येतील तारे कुणा मोजितां ? १९

प्राणिसृष्टींत असे नर धन्य !
त्या नरांत नर पंडित धन्य !!
राष्ट्रभक्तहि तयाहुन धन्य !
धन्य त्यांत 'तिलक' प्रभु धन्य ! २०

—:-०-:—

## गुरुदक्षिणा

[कवि—"यशवंत."]

देशान्तरास उदरंभरणार्थ गेलों,
कालान्तरें परतुनी परि आज आलों;
श्रीसद्गुरूपदयुगा चिर-वंदनीया
धालों मनीं बघुनियां दृढ वंदुनीयां. १

ज्याचें सदा हृदयिं पूजन म्यां करावें,
शेजेवरी नयन झांकुनि ज्या स्मरावें,
पाहावया अमित उत्सुकही असावें,—
तद्दर्शनें सुख अमूप न कां मिळावें ? २

भोगीत तीव्र असलों जरि आपदेतें
जीची स्मृतीहि मजला सुख शांति देते,
ती मूर्ति आज दिसली बहु वासरांनीं,
आलों जनांत जणुं संपुनि वास रानीं. ३

जी वाहते तुमचिया पदिं काव्यगंगा
तीचे तुषार मिळतांच मदीय अंगा
झालों कृतार्थ सुभगें प्रभुजी ! पुनीत
धालों पुन्हां करुनि मज्जन वाहिनींत. ४

नक्षत्र तें चमकतें रविच्या प्रकाशीं
हो तत्प्रदर्शन निशासमयीं विकाशीं,
तैसा जरी चमकलों असतांच दूर
मी तेजहीन तुमच्या चरणांसमोर. ५

माता पिता सुहृद हीं प्रिय तीन नातीं
एकत्र होउनि घडे गुरुची सुमूर्ति,
मत्पूर्वपुण्य फळुनी मज लाभली ती;
तोतें कितीहि नमिलें तरि हो न पूर्ति. ६

मातें तुम्हीच जगतीं गुरु दक्ष नेते
द्यावें तुम्हांस जरि मी गुरुदक्षिणेतें,
पूर्वीच मी निजतनू पदिं वाहिली ना ?
घ्या दक्षिणा समजुनी मज पाद-लीना ! ७

जो जो मदीय वदनांतुनि येइ बोल,
जी जी घडेल कृति मत्करिं या विलोल,
तें दिव्य भव्य सगळें तुमच्या प्रभावें;
ती दक्षिणाच तुमच्या पदीं नम्र भावें ! ८

* * *

हे चार बोल चुकले मुकले मुलाचे
(कीं तेज घालुनि तुम्ही दिधल्यां डुलांचे).
अर्पीत साधुनि घडी गुरुपूजनाची
नाहींच फूल परि पाकळि ही फुलाची. ९





अनुक्रमणिका

# साधुकविश्रेष्ठ तुकाराम महाराज याच्या चरित्राची कालव्याप्ति.

श्रीतुकाराम महाराज ह्यांस जन्मापासूनच श्रीसमर्थ रामदास ह्यांचे समकालीन समजण्याचा प्रघात आहे. श्रीसमर्थांचें जननं शकाब्द १५३० च्या रामजयंतीस सूर्य खस्वस्तिकीं असतांना झालें; त्याच वर्षी साधुश्रेष्ठ तुकारामही जन्म घेते झाले असें लोक मानितात.

परंतु, वरील दोघांही साधूंच्या आयुष्याच्या पुढील व्याप्तींत मात्र पुष्कळच अंतर! श्रीसमर्थ शकाब्द १६०३ त समाधि घेतात–म्हणजे पूर्ण ७३ वर्षें वांचतात, तर तुकाराम महाराज शकाब्द १५७१ तच म्हणजे आपल्या वयाच्या ४१–४२ वर्षांतच—

"जरा कर्णमूळीं सांगों आली गोठी ॥
मृत्यूचिये भेटि जवळी आली ॥
बहुकाळ माझा केलासे सांभाळ ॥
पांडुरंगें मूळ पाठविलें ॥"

असें आपल्या सर्व अनुयायांस सुचवून देहातीत होतात! आजकालच्या सामान्य समजुतीनें वरील प्रमाणें तुकाराम महाराजांच्या इहलोकच्या वास्तव्याची व्याप्ति काय ती ४१ वर्षांचीच! म्हणजे ४० च्या आंतच मृत्यूची भेट जवळ आली असें कानांत बजावणारी जरा–म्हणजे म्हातारपणाची स्थिति–तुकोबांस प्राप्त होण्याइतक्या जरत्कारू प्रकृतीचे हे तुकोबा होते कीं काय? अस्तु! तात्पर्य एवढेंच कीं तुकाराम महाराजांच्या इहलोकिक आयुर्व्याप्तीचें संशोधन व्हावयास हवें आहे. हें संशोधन दीड एक तपापूर्वीच ह्या लेखकाच्या व रा. रा. विश्वनाथ काशीनाथ राजवाडे ह्यांच्या सहविचारानें 'ग्रंथमाला' मासिकांत करण्यांत आलें होतें. तें जरी बरेंच साधार होतें तरी कांहीं गौण बाबतींत अपुरें असल्यानें आक्षेपार्ह ठरून बऱ्याच टीकेप्रतिटीकेस पात्र झालें. आणि रा.रा. बाळकृष्ण अनंत भिडे, बी. ए., पूर्वी निघत असलेल्या निर्णयसागरी 'काव्यसंग्रहाचे' संपादक, ह्यांसारख्या कित्येकांस जरी तुकारामबोवाचें जन्मवर्ष ग्रंथमालेंतील संशोधनांत दाखविलेलें मान्य वाटलें तरी त्याच दिशेनें पुढें विचार करून उपलब्ध सामग्रीची छाननी करण्याचें काम कांहीं त्यांस आपल्या 'तुकाराम बोवा' ह्या नांवांच्या निबंधांत करितां आलें नाहीं. अर्थात् प्रश्न आजही अनिश्चितोत्तर असाच राहिला. 'महाराष्ट्र-सारस्वत'कर्ते रा. रा. विनायक लक्ष्मण भावे यांनींही ह्या प्रश्नाचा छडा लाविला नाहीं, इतकेंच नव्हे, तर ते तुकाराम बोवांचा जन्मशकही १५३० च धरून चालतातसें मानावें लागतें. म्हणजे पूर्वी बरेंचसें पल्लयास पोंचलेलें सर्व संशोधन जवळ जवळ फुकटच गेल्यासारखें झालें! कारण, भारतेतिहाससंशोधक मंडळांतील एका संशोधकाग्रणीनें लिहिलेल्या म्हणून, प्रकाशित होणाऱ्या पुस्तकांत ज्या संशोधनास मान्यता मिळाली नाहीं किंवा ज्या शोधाचें दृढीकरण झालें नाहीं, तो शोध अश्रद्धेय होऊन कायमचाच मागें पडण्याचा संभव; असें असल्यामुळें आज हा विषय फिरून नव्याप्रमाणें हातीं धरण्याचा प्रसंग ओढवला. तेव्हां 'आलिया भोगासी असावें सादर' ह्या तुकारामोक्त न्यायानें लेखक तें काम करणार आहे. वाचकांच्या समजुतीसाठीं प्रथमच तुकारामचरित्राच्या रूपरेखा दाखविण्यांत येत आहेत. त्या साधुश्रेष्ठाच्या जीवनाच्या ह्या शाब्दिक नकाशांत कालोल्लेख प्रथम मुळींच असणार नाहींत. तर एकामागून एक जन्म, बाल्य, शिक्षण, तारुण्य, प्रौढत्व आणि वार्धक्य अशा त्या त्या अवस्थांतील लहान मोठ्या प्रत्यक्ष व आनुमानिक ज्या ज्या गोष्टी गोवितां येतील त्यांचाच मात्र क्रमानें उल्लेख केला जाईल. पुढील चरित्रास जरि क्वचित् महिपतिकृत 'भक्तलीलामृता'चा आधार घेण्यांत आला, तरी त्याचा बहुतेक भाग तुकारामबोवांच्या उपलब्ध व सर्वमान्य अशा अभंगांनीं म्हणजे जवळ जवळ आत्मचरित्राच्याच पद्धतीनें सजविलेला दिसेल.

महिपति तुकारामाच्या ७ पूर्वजांची माहिती देतो. तशीच ती राजवाडे यांच्या संग्रहीं असलेल्या एका जुन्या ज्ञानेश्वरीच्या पोथीच्या मलपृष्ठावर दिलेल्या तुकाराम बोवांच्या वंशावळींतही आढळते. मात्र तुकारामाचा आजा आणि पणजा ह्यांच्या नांवांत भेद आहे. महिपति-दत्त वंशावळींत तीं नांवें



कान्हा आणि शंकर अशीं असून राजवाड्यांच्या संग्रहांतील पोथींत रंगनाथ आणि सोमाजी अशीं आहेत. शंकराचेंच सोम हें नांव पर्याय असून, कान्हा कृष्ण ह्याचेंच रंगनाथ हें पर्याय होय, ही गोष्ट विचारवंत सुज्ञांस सहज पटण्यासारखी आहे. रा. राजवाडे यांच्या संग्रहांतील पोथी व तिच्या मलपृष्ठावरील तुकोबांची वंशावळि हीं ह्या लेखकानें प्रत्यक्ष पाहिलेली आहेत.

तुकोबांचे वडील बोल्होबा. हा गृहस्थही मोठा पंढरीभक्त होता. तो २४ वर्षें पंढरीची वारी करीत असे. वारी करूं लागण्याच्या वेळेस त्याचें वय १५।१६ वर्षीचें तर असेल! परंतु दोन तपें पुत्रेच्छेनें वारी करीत असूनही त्याला संतान नव्हतें. त्याची बायकोही नवऱ्याबरोबर जात असे. अर्थात् बोल्होबास वयाच्या चाळीशीपर्यंत कांहीं पुत्रसंतान नव्हतें. आणि ही गोष्ट रा. भिडे, माडगांवकर इत्यादि सर्व तुकारामचरित्रलेखकांस महिपतीप्रमाणें मान्यच आहे. ह्यानंतर बोल्होबास तीन मुलगे आणि एक मुलगी अशीं चार अपत्यें झालीं. हीं दोन दोन वर्षांच्या पाळण्यानें झालीं असें मानिलें तरी मुलगीच्या जन्मकालीं बोल्होबाचें वय फार तर ४८ वर्षीचें असेल. बोल्होबानें आपले तिन्ही पुत्र आणि मुलगी यांचीं लग्नें संपादिलीं. मुलांचीं लग्नें त्यांच्या वयाच्या पंधरासोळा वर्षांच्या वयांत केलीं असें म्हटलें तरी पहिला मुलगा जो सावजी त्याच्या लग्नाच्या वेळीं बोल्होबा ५८ वर्षीचा असणार अणि तुकोबांच्या लग्नांत ६० वर्षांचा असणार. तुकयाबंधु कान्होबाच्या लग्नसमयीं त्याचें वय ६० च्याही वर असण्याचाच संभव विशेष. मुलीचें लग्न, कदाचित् नव्हे तर निःसंशय, सावजीच्याही आधीं होऊन गेलें असेल. मुलांना ज्या बायका मिळावयाच्या त्याही आठ वर्षांपेक्षां अधिक वयाच्या असण्याचा संभव फारच कमी. त्या कालच्या बोल्होबाच्या संसाराचें वर्णन महिपति खालीलप्रमाणें करितोः—

पुत्र सुना धन संपत्ति। भ्रतार युक्त सौभाग्यवती॥
याहूनि आनंद स्त्रियांचे चित्तीं। नसे निश्चित दूसरा॥
साहित्य सर्व अनुकूळ। उदीम करितां होय सुफळ॥
म्हणें पडो नेदी अळुमाळ। दीन दयाळ तयांचें॥ ५९॥

ऐशा रीतीं सारितां काळ। वार्धक्यदशा आली केवळ॥
मग सावजी पुत्र ते वेळ। आपणा जवळ बोलाविला॥७१
म्हणे आतां आमुचें वार्धकपण। तूं वडील पुत्र सुजाण॥
तरी संसारांत घालोनि मन। देणें मागणें सांभाळीं॥७२॥

घरांत नांदूं लागलेल्या अशा तिन्ही सुनांसकट आपले तिन्ही पुत्र आणि धन धान्य संपत्ति व सफल होणारा वाढता उदीम ह्या स्थितीचा आतृप्ति अनुभव घेऊन केवळ वार्धक्य प्राप्त झाल्यावर बोल्होबानें आपल्या सुजाण अशा वडील सावजी नामक पुत्राला 'तूं आतां सुजाण आहेस, आमचें आतां केवळ वार्धक्य झालें आहे म्हणजे 'अंगं गलितं पलितं मुंडं' ह्या स्थितीला आम्ही पोंचलों आहों, तरी संसारांत मन घालून, देणें, मागणें, हिशेब ठिशेब ह्या भानगडी—हें दगदगीचें कर्म—आतां तूं संभाळ' असें सांगितलें. अर्थात् बोल्होबाचें वय त्यावेळीं पांसष्टाच्या आसपासचें असण्यास कांहीं बाध नाहीं. तें त्याहून कमी मानावयाचें म्हणजेच न्यायविरुद्ध होणार आहे. बापाच्या वयाच्या बेचाळीसाव्या सुमारास जन्मलेला त्याचा वडील पुत्र सावजी हा, त्या बापानें 'सुजाण' म्हणून संबोधून आपल्या दहा माणसांचें चांगल्या तऱ्हेनें चालवितां येण्यासारखा सावकारीचा कारभार हातीं सोंपविण्यासारखा 'सुजाण' म्हणजे पंचवीशीच्या घरांत तरी असावयास हवाच. अर्थात् त्याच्या पाठच्या तुकारामाचें वयही विशी उलटलेलें निःसंशय मानणेंच आलें. तेव्हां तेराव्या वर्षींच बापाच्या वार्धक्यातिशयानें तुकारामाच्या खांद्यावर उदीमाचें जोखड पडलें हें म्हणणें वस्तुस्थितीस सोडून होय. तें कवीच्या अतिशयोक्ति अलंकारमय कृतीसच पोषक. ऐतिहासिक संशोधकाच्या मनास त्यामुळें भ्रम पडतां कामा नये. सारांश काय, विशीपुढील २२।२३ किंवा २५ ही वर्षांच्या वयाच्या सावजीच्या तोंडांत —

"मी प्रपंचीं न गुंतें सर्वथा। तीर्थाटनासि जावें आतां।
वैराग्य चित्ता येतसे॥ ७४॥ परी तुम्हीं मातापिता
शिरीं। यास्तव गुंतोनि राहिलों घरीं॥ शास्त्राविरुद्ध
जातां दुरी। लोकाचारीं विपरीत॥ ७५॥

हे विचार आणि ही भाषा जशी शोभणें संभवनीय आहे, तशी ती १३+२=१५ वर्षांच्या वय।च्या साव-





अनुक्रमणिका

जीच्या तोंडीं निभ्रान्त शोभणार नाहींत. उलट, आणखी एका तऱ्हेनें ह्याचा विचार करून पाहिल्यासही अशीच अडचण उपस्थित होते. तुकारामाच्या वयास तेरा वर्षें असतांना सर्व मुलांचीं लग्नकार्यें उलगडून बोल्होबा मोकळा झाला होता असें मानावयाचें म्हणजे कान्होबाचें लग्न दहाव्याच वर्षी झालें असें मानावें लागतें. अर्थात् मुलीचें लग्नही त्याच सुमारास तिच्या आठव्या वर्षी म्हणजे बोल्होबाचें वय जवळजवळ ५५ वर्षांचें असणार. पंचावन वर्षांच्या वयांत दुखणेंबाणें कांहीं नसतांना पंधरा वर्षांच्या आंतल्या वयाचीं चार मुलें असणारा बोल्होबा 'केवळ वार्धक्या'स पोंचून व्यवहार पाहण्यास असमर्थ झाला होता असें मानतांना सृष्टिक्रमाच्या सामान्य समजुतींस चांगलाच काट द्यावा लागतो. सावकारीचा धंदा म्हणजे बहुतेक गादीवर बसून लोडास टेंकूनच होत असतो. त्यालाही असमर्थ करून सोडणारें असें केवळ वार्धक्य आलें हें म्हणणें शोभण्यास मनुष्याचें वय ७५ च्या घरांतच हवें. तें ५५ चें निःसंशय मानतां कामा नये.

बोल्होबानें थोरल्या 'सुजाण' मुलाचें विनीत परंतु उदासीनतेचें उत्तर ऐकिल्यावर मधल्या तुकारामास पुढें बोलाविलें आणि त्याला 'संसारवृत्ती निरविली।' आणि सांगितलें कीं--

देणें घेणें उदीम हातवटी।
तोटयानफ्यांत असावी दृष्टी॥
जेणें स्वहित होईल शेवटीं।
तैसी गोष्टी करावी॥ ८२॥

वरीलप्रमाणें बापाची आज्ञा होतांच तुकारामानें ती शिरसावंद्य केली. लोक तुकारामाच्या कारभाराकडे पाहून संतोषित झाले. बोल्होबाचा हा मुलगा मोठा व्यवहारदक्ष आहे असें म्हणून त्याची दैववानांत गणना करूं लागले. व्यापारांत तुकशेटीची दृष्टि चांगली चालून यशच येत गेलें. थोराथोरांचे स्नेह जडले व एकंदरीनें सर्व गोष्टींची अनुकूलता वाढत चालली.

पुढें सृष्टिक्रमाप्रमाणें वार्धक्यातिशयानें तुकारामबोवांचे वडील वारले. तुकारामबोवांची मातृपितृभक्ति उत्तमपैकींच होती. त्याची साक्ष त्यांचाच खालील अभंग देत आहे.

मायबापें केवळ काशी। तेणें न वजावें तीर्थासी॥ १॥ पुंडलीकें काय केलें?। परब्रह्म उभें ठेलें॥ २॥ तैसा होईं सावधान। हृदयीं धरीं नारायण॥ ३॥ तुका म्हणे मायबापें। अवघीं देवाचीं स्वरूपें॥ ४॥

हे विचार तेरा वर्षांच्या पोराचे निःसंशय नव्हेत. आणि जर ते तसे असते तर, म्हणजे तेरा वर्षांच्या वयांतच जर इतकी विरक्ति अंगीं असती तर, ते लग्नाचा पाश अडकून घेण्यास कधींच सिद्ध होतेना. कारण, लग्न ह्यांचेंच नव्हे तर पाठच्या भावाचेंही बापानेंच करून दिलें होतें. अर्थात् ह्यांचें लग्न ह्याच्या अकरावेच वर्षी झालें असें मानण्याचा प्रसंग येतो. तेरा वर्षांच्या वयांत ज्याला वरील अभंगांतील विचार सुचतात, म्हणजे ज्याला परब्रह्माचीही कल्पना चित्तांत ठसली असते, इतकेंच नव्हे तर जें परब्रह्म तोच नारायण आणि जो नारायण तींच मायबापें असलें अद्वैतज्ञानही ज्याला झालें असेल, तो मनुष्य लग्नपाशांत निःसंशय पडणार नाहीं. बरें, हें लग्न तरी एकच कां? छे! दोन लग्नें तुकारामबोवांचीं वडिलांनींच करून दिलीं होतीं असें सर्व चरित्रकार आणि वाचक मानितात. दुसरें लग्न कां करावें लागलें होतें? तर, महिपति म्हणतो, आणि त्याचाच सर्व अनुवादही करितात कीं, पहिली, लोहगांवची, थोरांमोठ्यांची केलेली जी मुलगी जिजाबाई तिला धापेची व्यथा होती आणि ती संसारास निरुपयोगी ठरली. म्हणून, पुण्यांतील धनाढ्य सावकार जो आपाजी गुळवे त्याची धडधाकड अशी मुलगी पाहून तिला बोल्होबांनीं मागणी घातली आणि त्यानेंही ती ह्या बारा तेरा वर्षांच्या मुलास दिली! सर्वच प्रकार विलक्षण भोळेपणाचा! पहिली मुलगी दमेकरी असल्यामुळें संसारास निरुपयोगी ठरण्यास तिचें निदान संसारोपयोगी वय तरी व्हावयास नको काय? तिला धापेची व्यथा लागून ती सर्वस्वीं निरुपयोगी ठरण्यास तिचें सासरीं महिनोगणती नव्हे वर्षोगणती राहण्याचें वय तरी व्हावयास नको काय? तसें तिचें वय झाल्यावांचून तिची व्यथा ही कायमचीच असून औषधपाण्यानें ही बरी होण्याची आशा नाहीं असें ठरण्यास कांहीं योग्य अवधीची आवश्यकताच मानावी लागूं नये ही केवढी आश्चर्याची गोष्ट?





अनुक्रमणिका

बरें, बोल्होबा काय आपला अगदीं सामान्य, अविचारी, दांडगट, गांवढळ, गुराखी कुळंबी तर नव्हता ना ? तो तर चांगला स्वतःचें लिहिणें टिपणें स्वतः करून देवघेवीचा व्यापार करणारा धनाढ्य सावकार होता. त्याच्या घरीं बायकांचें हलकें काम करण्यास दासी असे. त्याला आपल्या बरोबरीच्या सोयऱ्याधायऱ्यांकडून भलें म्हणवून घेण्यांची चाड होती. अकराबारा वर्षांच्या तुकारामबोवांची बायको त्यावेळीं सहा सात वर्षांचीच पोर असणार. अर्थात् ती कधींमिधीं चार आठ दिवसच सासरीं येऊन राहणार आणि तीही बरोबर एखादी पाठराखीण किंवा मुराळी घेऊनच आलेली असावयाची. तिची धाप सासूसासऱ्यांच्या डोळ्यावर यावयाचीच त्या वयांत पंचाइत. आणि क्वचित् आलीच तरी ती आकस्मिक कांहीं कारणानें उत्पन्न झालेली असें समजून तिला लगेच परत माहेरीं पाठवून देण्याचाच त्यांचा विचार व्हावयाचा. आणि त्याप्रमाणें ती माहेरीं गेली कीं ती धापेची बाब गेली पार विस्मृतींत ! असाच प्रकार होण्याचा तो काळ म्हणजे तिची वयोवस्था होय. कित्येक वेळां माहेरची आठवण होऊनच मुलगी मुसमुसत असावी किंवा तिच्या पाठराखणारणीच्या सांगीवरून ती कुठें भ्यालीच असावी किंवा झपाटली असावी असाही निर्णय होऊन तिच्या रोगाचें निदान होणें लांबणीवर पडावयाचें. असे प्रकार कित्येकदां तरी झाले पाहिजेत असेंच त्या तिच्या वयाला योग्य.सारांश काय,संसाराला निरुपयोगी करून सोडणारा धापेचा दुर्धर रोग सुनेस जडला आहे असें निदान सासरच्या माणसांचें व्हावयास ती मुलगी पदरास येऊन कांहीं वर्षे लोटलीं पाहिजेत; किंवा पदरास येण्याचें वय होऊनही तिला पदर येत नाहीं; नवऱ्यास तिच्या संगतीची अपेक्षा असून तिला पदर न आल्यामुळें त्याची कुचंबणा होत आहे; अशा स्थितींत तिच्या प्रकृतीचें बारकाईनें निरीक्षण करण्याचा सासरच्या माणसावर प्रसंग येतो. अर्थात् असा प्रसंग येण्याच्या वेळेस तिचें वय चौदाचे पुढें आणि नवऱ्याचें वयही अठराच्या पुढचें अशी स्थिति कल्पावी लागणार. तेव्हां बारा तेरा वर्षांच्या वयांतच बोल्होबानें बुवांचीं दोन लग्नें लाविलीं होतीं हीही गोष्ट विचारास पटण्यासारखी नाहीं. सारांश काय कीं, तुकारामबोवांच्या शिरीं संसाराचा भार पडला तेव्हां ते तेरा वर्षांचे नसून चांगले पंचविशीच्या आसपास तरी असलेच पाहिजेत. कारण वस्तुस्थिति अशी होती कीं, पहिली बायको संसारास लागण्याच्या वयाची होऊन निरुपयोगी ठरून बोवांचा द्वितीय संबंध त्यांच्या वडिलांस घडवून आणावा लागला; आणि तोही नामांकित थोरांमोठ्यांची मुलगी मिळून होऊं शकला. तेव्हां सवतीवर ही आपली मुलगी देण्यास तयार होणाऱ्या तिच्या त्या धनाढ्य बापानें मुलगा खरोखरच वयानें, गुणानें चांगला निवटलेला आहे अशी स्थिति पाहूनच आपली मुलगी सुखानें त्याला दिली असली पाहिजे. पहिल्या सवतीसंबंधानें तिचें पोरबाळ होण्याचें वय होऊनही तिला तें कांहीं झालेलें नाहीं, तिचा घरांत संसारकृत्यें करण्यालाही व्हावा तसा खरोखरच उपयोग होत नाहीं, आणि अशी तिची पडती बाजू तिच्या आईबापांसही मान्य आहे, तेव्हां त्यांजकडूनही आपणांस कांहीं अपवाद लागावयाचा नाहीं; चारचौघेही आपल्याला ह्या कामीं नांवें ठेवणार नाहींत; इतका निश्चय जेव्हां उभयपक्षीं ठाम झाला असेल तेव्हांच हें दुसरें लग्न झालें असेल. आणि अशा ह्या वाटाघाटीनें होणाऱ्या द्वितीय संबंधाच्या वेळीं ज्याच्याशीं तो संबंध घडावयाचा त्याला निवृत्तीचे विचार शिवलेलेही असतां कामा नयेत. तो प्रवृत्तिमार्गी असून, स्वजातियोग्य गृहस्थाश्रमांतच आनंदानें कालक्रमणा करणारा सगुणैकपूजक भक्तिमार्गी मात्र असूं शकेल. ह्यासंबंधांत बुवांचे खालील उद्गार मनन करण्यासारखे आहेत.

२२७

अवघ्या दशा येणें साधती। मुख्य उपासना सगुण भक्ति।
प्रगटे हृदयीं मूर्ति । भाव चित्तीं शुद्ध जाणोनियां ॥१॥
बीज आणि फळ हरिनाम । सकळ पुण्य सकळ धर्म ।
सकळां कळांचेंही वर्म । निवारी स्रम सकळ ही ॥२॥
जेथें कीर्तन कथा नामघोश । करिती निर्लज्ज हरिदास ।
वोथंबळे सकळही रस । तुटती पास भवबंधनें ॥३॥
येती अंगा वसतीं लक्षेणें । अंतरीं देवें धरिलें ठाणें ।
आपण चींतीं तयाच्या गुणें । जालें पेणें सुखवस्तीचें ॥४॥
नलगे सांडावासे आस्त्रम । उपजलीये कुळींचा धर्म ।
आणिकही नकरावा स्रम । येक पुरे नाम विठोबाचें ॥५॥
वेदपुरुष नारायेन । योगियांचें ब्रह्म सुन्य ॥
मुक्त आत्मा परिपूर्ण।तुका ह्मणे सगुण आह्मां भोळियां।६।



३५६

माझिया मीपणावरी पडो पाशाण । जळो हे भूषण । नाम माझें॥

पापा नाहीं पार दुखाचे डोंगर। जालों ये भूमीस वोझें ।१।

\+ + + ×

काया वाचा मनें अघटित कानें । चर्मचक्षु हातपायें॥

नींदा द्वेश घात विश्वासीं वीभचार । आणिक सांगो किती काये ॥ २ ॥

लक्षीमीमद माते घडले मांहादोश । पत्नी दोन भेदाभेद॥

पीत्रुवचनी घडली अवज्ञ्या अवीचार । कुटळकुचरवादी नींदा ॥ ३ ॥

आणीक कीती सांगों ते अवगुण । नवळे जीव्हा कांपे मन॥

भूतदया उपकार नाहीं शब्दाधीर। वीशयी लंपट हीणा।४।

संत मानभाव आईका हीं उतरें। अवगुण आईचार वृद्धी पापा ॥

तुका म्हणे सरतें करा । पांडुरंगीं शरण आलों मायेबापा ॥ ५५ ॥

८२७

वक्त्या आधीं मान गंध अक्षेतां पुजन ॥

श्रोता ईती जाला जाण । तऱ्हीं त्या नाहीं उचित ॥१॥

सीर सर्वांगा प्रमान । येथाविधी करचरण ॥

धर्माचें पालन । सकळीं सत्यें करावें ॥ २ ॥

पट पुत्रा सांभाळी । पीता त्याची आग्न्यां पाळी ॥

प्रमाण सकळीं । ते मर्यादा कराई ॥ ३ ॥

वरासनीं पाश्यान । तो न मानावा सामान्ये ।

येर उपकर्णें । सोनीयांची परीं नींचें ॥ ४ ॥

सोनियांचा पैजन । मुकुटमनी केला हीन ॥

जयाचे कारण । तये ठाई आलंकार ॥ ५ ॥

सेवका स्वामीसाठीं मान । याचें नाम त्याचे धन ।

तुका म्हणे जाण । तुम्ही संत येदर्थी ॥ ६ ॥

वरील अभंग 'तुकारामबुवांचा अस्सल गाथा' ह्या रा. भावे ह्यांनीं छापलेल्या पुस्तकांतूनच घेतले आहेत. त्या अभंगांत तुकारामबोवांनीं आपले ऐन पंचविशींतील व पुढीलही बहुतेक चाळे आणि धर्मकर्म, उपासना, ज्ञान इत्यादिविषयक विचार ह्यांचा उल्लेख केलेला आहे. बोवांचे ऐन पंचविशींतील चाळे म्हणून जे, शब्द वापरण्यांत आले आहेत त्यावरून माणुसकीविरुद्ध कांहीं विलक्षण घोर कृत्यें बोवांनीं केलीं असावींत असें दाखविण्याचा यत्किंचित्‌ही उद्देश नाहीं. तरी तारुण्यांत धनधान्यसंपन्नता असल्यावर ज्या तऱ्हेची वर्तणूक सामान्य लोकांच्या हातून घडते त्या तऱ्हेची आडदांडपणाची अविचारीपणाची वर्तणूक तुकारामबोवा हे केवळ तरुण तुकशेटी असतांना त्यांच्या हातून निःसंशय घडली होती असें म्हणण्यास मात्र कांहीं एक अडचण नाहीं. ३५६ व्या अभंगांत "काया वाचा मन म्हणजे पंचकर्मेंद्रियें आणि पंचज्ञानेंद्रियें, तसेंच अंतःकरणपंचक, हीं सर्व आपलीं बाह्याचारीं विषयानुरक्तच होतीं; निंदा, द्वेष, विश्वासघात, व्यभिचार ( मानसिक तरी ) लक्ष्मीमद इत्यादि सर्व दोषांचें आपण वसतिस्थान होतों इतकेंच नव्हे तर प्रत्यक्ष पितृवचनाची अवज्ञाही आपल्याकडून घडत असे; दोन बायकांत एक नावडती आणि दुसरी आवडती असली भेदबुद्धिही आपल्या ठिकाणीं परिपूर्ण होती" असें बोवाच सांगत आहेत. वरील अभंग कांहीं बोवांनीं वरील प्रकारचें वर्तन घडत असण्याच्या वयांत केलेले नव्हेत. तर ते पुढें प्रौढदशेंत आल्यावर आणि कांहीं संकटांचे तडाखे बसून इंगा फिरल्यानें अनुतप्त झाल्यावर पूर्वायुष्कमाचें सिंहावलोकनादाखल आणि ईश्वरापुढें आत्मनिवेदन करण्याच्या बुद्धीनें उद्गारलेले आहेत. वरील स्वदोषनिवेदनपर अभंगांतील तिसरा चरण विशेष लक्ष्य आहे.. त्यांत बोवा म्हणतातः 'मला लक्ष्मीमदानें महादोष घडलें. त्यानें मला दोन बायका आणि त्यांच्यामध्यें आवड निवड करणें हा दोष जडला. त्यापायींच माझ्याकडून पितृवचनाची अवज्ञा झाली. मी अविचारानें कुटिल, कामचुकार, तोंडास तोंड देणारा किंवा तर्कवितर्क करून वाद माजविणारा, किंवा वादविवादांत निंदा करणारा असा झालों." पुढें बोवा म्हणतात "एकंदरींत माझ्या सारख्या विषयीं लंपट असणाऱ्या हीणकसास, तो आतां पश्चात्तापानें पांडुरंगाच्या पायीं शरण आला आहे असें जाणून, अहो संत मानभाव ! आपणच माझे मायबाप आहांत तेव्हां, सन्मार्गाला लावा म्हणजे झालें !" वरील अभंगावरून असा बळकट संशय येतो कीं, तुकशेटीनें वडील अगदीं जर्जर झाल्यावर त्यांच्या संतोषानें कांहीं द्वितीय संबंध जोडिला नाहीं. तर ते



अनुकूल नसतांनाच केवळ दुसरीही एक विवाहित पत्नी उपभोगास असलेली चांगली अशा कामलालसेनें आपल्या पसंतीवर व चलतीच्या बजनावर दुसरी बायको मिळविली असावी. अर्थात् पहिलीच्या अंगीं कांहीं अपरिहार्य अशी खोड ठेवावी लागणारच हें असलें काम करितांना. तेव्हां तिला कार्यकारण झालेल्या तात्पुरत्या धापेच्या विकृतीचा–ती कायमची आहे, औषधें इत्यादि कितीही उपचार केले तरी बरी होण्यासारखी नाहीं–असा बोभाट करून तिचें आपल्या एवढ्या मोठ्या तोलाच्या संसारास अगदीं निरुपयुक्तत्वच आहे असें सांगवून व सांगून तुकशेटीनें हा द्वितीय संबंधाचा बार मोठ्या थाटांत उरकून घेतला असावा. असें नसतें तर पुढें प्रौढवयांत त्यांची प्रेमळ प्रथम पत्नी व तिचा ह्यांचा आठ दहा वर्षांचा एकुलता एक मुलगा मेला तेव्हां—

बाइल मेली मुक्त झाली । देवें माया सोडविली ॥ २ ॥
विठो ! तुझें माझें राज्य । नाहीं दुसऱ्याचें काज ॥३॥
पोर मेलें बरें झालें । देवें मायाविरहित केलें ॥ ४ ॥
माता नेली मजचि देखतां । तुका म्हणे हरिली चिंता॥५॥

असे अत्यंत करुणरसपूर्ण आणि परमेष्टवियोगानें विषण्ण झालेल्या मनोवृत्तीचे दर्शक उद्गार त्यांच्या तोंडांतून निघाले नसते. बायको कशी तर जिच्या बदल आपणांस माया असणें योग्य होतें आणि तशी ती होतीही, व पुढेंही राहिली असती अशी. आणि म्हणूनच ती मेली तेव्हां तिजविषयीं ती मुक्त झाली, कारण तशीच ती सद्गुणी पतिव्रता होती; तिला मुक्तीशिवाय इतर प्रकारची कोणतीही अधोगति प्राप्त होणें शक्यच नाहीं; अशी बोवांची मनोदेवता त्यांस सांगत होती. त्याचप्रमाणें तिच्या कुक्षींत उत्पन्न झालेला आपला प्रिय पुत्र, ज्याच्या ठायीं महिपति म्हणतो त्याप्रमाणें तुकारामबोवांचें 'प्रेम गहन' होतें असा सद्गुणी, कुलदीपक होण्यासारखा पुत्र, तो असल्यानें त्याच्या ठिकाणीं आपली अत्यंत माया होती व ती तशीच राहिलीही असती, असें असल्यामुळें तो तसला पुत्र गेल्यानें आतां आपणांस 'मायाविरहित'च देवानें केलें, असें त्याच्यासंबंधानें बोवा म्हणतात. अशी स्थिति एकवीस वर्षांच्या वयांत घडणें अगदींच असंभवनीय आहे. एकवीस वर्षांच्या वयांत असला पुत्र असणाऱ्या बापास तो पुत्रलाभ कोणत्या वयांत घडावयास हवा ह्याचा विचार केला म्हणजे असंभाव्यता डोळ्यापुढें ठळठळीत उभी राहिलीच पाहिजे. सारांश काय, तुकशेटींची पहिली बायको 'अन्न अन्न' करून वारली आणि त्यांचा, त्या बायकोस झालेला, ज्याच्यावर त्यांचें 'गहन प्रेम' होतें असा, आठदहा वर्षें वयाचा मुलगा वारला, तेव्हां ह्या तुकशेटीचें वय तारुण्य संपून प्रौढत्वाप्रत पोचलेलें असलें पाहिजे असेंच म्हणणें प्राप्त आहे. अर्थात् ह्या तारुण्यांतून पोरवाळ होऊन प्रौढत्वाप्रत पोंचण्याच्या मार्गांत असण्याच्या वयांत 'नलगे सांडावा आश्रम' किंवा 'उपजलिये कुळींचा धर्म' असा कोटिक्रमच त्यांच्या मनाला पटावा आणि सतरा पंधरा प्रकारचे ईश्वरप्राप्त्युपाय करण्याची कांहीं एवढी आवश्यकता नसून 'एक विठोबाचें नाम पुरे' आहे. तो वेदपुरुष नारायण आणि ते योगियांचें शून्य ब्रह्म आणि तो परिपूर्ण मुक्त आत्मा ह्यांच्याशीं आपणांस कांहीं कर्तव्य नसून 'तुका म्हणे आम्हां भोळियां' सगुण मूर्तिमंत चतुर्भुज पांडुरंगच हवा; ही स्थिति खरोखरच गृहस्थाश्रमांत चूर असणाऱ्या प्रौढ भाविकाला अगदीं योग्य आहे. त्याचप्रमाणें 'वक्त्या' ब्राह्मणासच–आधीं मान–अग्रपूजा–योग्य आहे. त्यालाच प्रथम गंधाक्षता लावल्या पाहिजेत. तो मान श्रोत्या अब्राह्मण शूद्रास तो कितीही जाण म्हणजे ज्ञानसंपन्न असला तरी कांहीं उचित नाहीं. कारण सर्वांगांना शिर हें प्रमाण प्रथम वंदनीय होय. त्या शिरा (ब्राह्मणोस्य मुखमासीत्–ह्या न्यायानें मुखाच्या) मागून यथाविधि म्हणजे शास्त्रांत सांगितल्या मार्गानें कर (क्षत्रिय), चरण (वैश्य, शूद्र) ह्यांनीं तें मुख म्हणजे ब्राह्मण सांगेल तें प्रमाण मानून सर्व वर्णांनीं धर्माचें सत्य पालन करावें. वरासनीं उंच बैठकीवर असलेली पाषाण (मूर्ति) सामान्य धोंडा मानून चालूं नये. तर त्याच्या ठिकाणीं देवभावच ठेवावा. त्याला नमन करावें. त्याचें पूजन करावें, ध्यान धरावें. इतर त्या पाषाणमूर्तीच्या संनिध असणारीं दुसरीं उपकरणें (निरंजन, गंधवटी, ताम्हन इ०) जरी सोन्याचीं असलीं तरी तीं नीचच-खालीं-असण्याच्याच योग्यतेचीं.





अनुक्रमणिका

पैंजण, तोरड्या किंवा वाळे ज्यांस नूपुरेंही म्हणतात तीं अगदीं बावनकशी सुवर्णाचीं असलीं तरी पायांतच शोभावयाचीं. तीं शिरावर ठेविलीं तर त्या शिरावरील मुकुटाची शोभा आणि मान्यता काय राहिली ? किंवा त्याला हीन म्हणजे खालीं गोठविला तर तेंही शोभणार नाहीं आणि घडणारही नाहीं. म्हणून तुका म्हणे ज्याचें जेथें कारण तेथें तें अलंकार होय. वरील मतेंही, संसाराला विटून जुन्यापुराण्या झालेल्या विरक्तांचीं निःसंशय नव्हत. तर अनुकूल स्थितींत गृहस्थाश्रम चालविणाऱ्या प्रौढप्रवृत्ति धर्मनिष्ठाचींच होत. तेव्हां अशा पस्तीशीच्या आंतबाहेरील वयानंतरच तुकशेटींचा बाप बोल्होबा वारला असवा व तो वारल्यावर कांहीं काळानें त्यांची आई कनकाई परलोकीं गेली असावी. बाप मरण्यापूर्वी किंवा मेल्यानंतर व आई असतांनाच तुकशेटींनीं द्वितीय संबंध केला, आणि त्या द्वितीयसंबंधाचें माणूस वयांत येण्याच्या अवधींत–म्हणजे सहज सहासात वर्षें तरी सांपडतातच, त्या काळांत–तुकशेटीस पहिल्या कुटुंबाचे पातिव्रत्यादि सात्विक गुण, तिच्या पोटीं पुत्रोत्पत्ति, आणि त्या पुत्राचेही बालखेळ आणि कौतुकास्पद सद्गुण इत्यादींचा वाढता अनुभव व म्हातारपणामुळें आधींच जख्ख झालेल्या आपल्या आईस आपल्या द्वितीयसंबंधाच्या कर्कशेकडून होणारा त्रास आणि त्या योगानें त्या दुसऱ्या बायकोच्या आडदांडपणाचाही वाढता अनुभव अशा परस्पर विरोधी गोष्टींशीं झगडावें लागल्यामुळें जेव्हां त्यांच्या वयाच्या चाळीशी पंचेचाळीच्या काळांत आईचा मृत्यु व पुढें पांचसहा वर्षांच्याच अवधींत दुष्काळ, दिवाळें आणि एका कुटुंबाचा अन्नान्नदशेनें घात होऊन त्यांचा एकुलता एक, गुणांचा पुतळा असा मुलगाही वारला तेव्हां त्यांस सहजच तीव्र वैराग्य बाणावें आणि त्यांनीं 'माता मेली मजचि देखतां, तुका म्हणे हरिली चिंता' असे उद्गार काढावे हें किती योग्य आहे तें उघड करून सांगण्याची आवश्यकता नाहीं. कारण आईचे जर डोळे देखत झांकले नसते तर बायको व मुलगा मरून देवकृपेनें आलेलें मायाविरहितत्व झुगारून देऊनही त्या जन्मदात्या माउलीची चिंता त्यांना वाहावयास लागून संसाराची उठाठेव करावीच लागली असती. येथें असा प्रश्न उत्पन्न होईल कीं, बोवा हे कांहीं आपल्या आईचे एकुलते एकच पुत्र नव्हते; त्यांचा वडील भाऊ सावजी जरी बोवांच्याही आधीं विरक्त होऊन तीर्थयात्रेस गेला होता तरी त्यांच्या पाठचा कनकाईचा मुलगा कान्होबा हा तर संसारी होताच कीं नाहीं ? त्यानें काय आपल्या आईची व्यवस्था ठेविली नसती ? बोवांनाच कायती तिची काळजी आणि चिंता बाळगावयास हवी होती आणि त्याला काय नको होती ? ह्या शंकेचेंही उत्तर कान्होबाच्यांच तोंडचा आत्मस्थितिदर्शक अभंगच देईल. कान्होबा पुढें म्हातारपणीं आपल्या बंधूच्या उदाहरणानें निस्सीम विठ्ठलभक्त बनल्यावर आपल्या पूर्वायुष्याचें सिंहावलोकन करून ईश्वराची करुणा भाकितांना म्हणतातः—

देवा मी चांडाल चांडाल । म्हणतां लागोतो ह वेल ॥ नसे पाहातां भूमंडल । ऐसा अमंगळ खल दुसरा ॥ १ ॥ जन्म उपजलीयापासूनी । असतें कर्में ते अझुनी । सतें आचरण नेणें स्वप्नीं । निखळ खाणी अवगुणांची ॥ २ ॥ भगित दया अथवा कथा । कानीं न साये हे वारता । अखंड वीशयांची वेथा । अधम पुरता अधमाहुनी ॥ ३ ॥ कामक्रोध डंब अहंकार । गर्व ताठा मदमछर ॥ यांचें तर माहेरघर । पर उपकार वैरी तैसा ॥ ४ ॥ निंदाद्वेश घात विश्वास । वारितां नाहीं केला आलस । करूं नये ते केले संत उपहास । **अभक्ष भक्ष तेंही भलें** ॥ ५ ॥ पाळिलें नाहीं पितृवचन । **सदा परद्वारीं परधनीं ध्यान। बोलो नये घडलें ऐसें अनोवीन। दासी गमन** आदि करूनी ॥ ६ ॥ काया वाचा मन-इंद्रियांसी । सकळ पापांचीच रासी । तुकयाबंधु म्हणे ऐसीयासी । आलों र्‍हसीकेशी तुज शरण ॥ ७ ॥

वरील अभंगांत मद्यमांसभक्षण, दासीगमन, परद्वारीं रमणें आणि परस्वापहार असलीं–म्हणजे तोंडानें ज्यांचा उच्चारही करूं नये अशाप्रकारचीं–अनन्वित पातकें सदोदित करण्याचा अभ्यासच ज्याला होता असें आपण असल्याची तुकयाबंधु स्वतःच साक्ष भरीत आहे. तुकशेटीस वरील दुर्गुणांचा स्पर्शही नव्हता. त्यांनीं विवाहित पत्नीच एक अधिक करून आपली तारुण्यांतील कामशान्ति करण्याचें धर्म्यव्रत आचरिलें होतें. अर्थात् वरील प्रकारें मद्य मांस मैथुन या तिन्ही



प्रकारांच्या पुरतेपणीं मगरमिठींत सांपडलेल्या आपल्या भावावर आईचें क्षेम सोंपवून निश्चिंत होण्यासारखी स्थिति नसल्यामुळेंच तुकोबांनीं आईची चिंता वाहणेंच योग्य होतें. तेव्हां तो एक प्रवृत्तींतील कर्ममार्गाचा अत्यंत बळकट पाश आपल्या देखत तुटलेला असल्याविषयीं पुढें योग्य प्रसंगीं त्यांच्या तोंडून ' माता मेली मजचि देखतां । तुका म्हणे हरली चिंता ' असे उद्गार ओघानेंच निघाले. तुकशेटी आणि कान्होशेटी ह्यांच्या वयांत कांहीं विशेषसें अंतर नव्हतें; कारण ते पाठोपाठचेच भाऊ होते.

आतां आणखी एका तऱ्हेनें विचार करावयाचा. तो हा कीं तुकाराममहाराजांनीं देह ठेविला, तेव्हां त्यांची द्वितीय पत्नी पांच महिन्यांची गरोदर होती. तिला ह्या खेपेच्या आधींचे दोन मुलगे विठोबा व महादेव असे असत. ह्या दोघांही मुलांपैकीं जाणता असा कोणीच नव्हता. अर्थात् ५।६ आणि ३।४ वर्षांच्याच वयाचे ते असले पाहिजेत. ह्या मुलांच्या अगोदरच्या तीन मुली लग्नें होऊन आपापल्या सासरीं नांदत होत्या. आणि त्यांचीं लग्नेंही त्या कालच्या वहिवाटीप्रमाणें लग्नाला अत्यंत योग्य होण्याच्या वयाआधीं तुकारामबोवांकडून झालीं असतील असा कांहीं फारसा संभव दिसत नाहींच. तर त्यांच्या लग्नाचा काल अतिक्रांत होऊं लागून जेव्हां त्या गळीं लागल्यासारख्या झाल्या असतील, तेव्हांच त्यांचीं लग्नें बोवांनीं केलीं असलीं पाहिजेत. ह्यावरून वडील मुलगी बोवांचे परलोकगमनकाळीं चांगली वीसेक वर्षांची तर खरी. अर्थात् तिच्या पाठोपाठच्या बहिणी १२।१४–१६।१७ वर्षांच्या वयांच्या असतील. तुकाराममहाराज शके १५७१ त परधामाप्रत गेले. त्यावेळीं त्यांची वडील मुलगी २० वर्षांची धरिल्यास तिचा जन्मकाल शकाब्द १५५१ च्या आसपास पडतो. म्हणजे शकाब्द १५३० त आजच्या समजाप्रमाणें बोवांचा जन्मकाल धरिल्यास त्यांचें वय त्यावेळीं २१ वर्षांचें असणार आणि ह्या काळीं मुलीला जन्म देणारी त्यांची द्वितीय पत्नी निदान १६ वर्षांची तरी धरली पाहिजेच. म्हणजे तिचा जन्म शकाब्द १५३५ च्या आसपासचा पडतो. दोघांमध्यें अंतर केवळ पांचच वर्षांचें ! आणि हें पहिली बायको संसारास निरुपयोगी ठरल्यावर झालेल्या ह्या द्वितीयसंबंधाच्या बाबतींत. आणि संसाराला निरुपयोगी ठरलेल्या पहिल्या बायकोसही ह्या काळीं आठदहा वर्षांचा एक मुलगा होता. तेव्हां तिचेंच वय ह्या वेळीं सहज २०।२५ वर्षांचेंही मानावें लागणार. म्हणजे नवराबायको ह्यांच्या वयांत कांहीं अंतरच नाहीं इतकेंच नव्हे, तर उलट बायकोच एक दोन वर्षांनीं वडील !!!

सध्यांच्या समजाप्रमाणें तुकाराममहाराजांच्या आयुष्कमाची व्याप्ति केवळ ४२ वर्षांची समजण्यांत चारी बाजूंनीं कशी अडचण पडते हें आतांपर्यंत दाखविलें. आतां प्रत्यक्ष कागदोपत्रीं पुराव्यानेंही काय निष्पन्न होतें ते पाहावयाचें उरलें. तेवढें पाहिलें म्हणजे ह्या गोष्टीचा निर्णय करण्यास ठीक पडेल.

तुकोबांच्या चवदा टाळकरी शिष्यांत लोहगांवचा सिउजी कासार ह्या नांवांचा एक गृहस्थ होता. तुकोबाला गुरु मानणारे हे त्याचे सवर्ण सवंगडी त्याच्याच वयाचे किंवा त्याच्याहूनही लहान वयाचे असले पाहिजेत. ह्या सिउजीचें वय आज समजल्या जाणाऱ्या तुकाराम जन्मशकाब्दकाळीं किती होतें हें जाणण्यास एक शिलालेखी पुरावा उपलब्ध आहे. त्याचाच आतां विचार करावयाचा. हा सिउजी कासार म्हणजे एक मोठेंच प्रस्थ होतें. रा. रा. लक्ष्मण रामचंद्र पांगारकर ह्यांनीं भारत–इतिहास–संशोधक मंडळाच्या तृतीय संमेलनांत ' तुकोबांचें लोहगांव कोणतें ?' असा एक निबंध वाचिला. तो १८३७ त छापिलेल्या त्या ' संमेलनवृत्त ' पुस्तकांत समग्र आलेला आहे. त्यांतील अवश्य तेवढा उतारा घेण्यांत येत आहे. रा. पांगारकर ह्या सिउजीस शिवबा असेंच आपल्या लेखांत संबोधितात. " ह्या ( तुकोबाच्या ) लोहगांवीं.... शिवबा कासाराचा वाडा मोठा असावा (असें त्याच्या आजच्या ) पडक्या भिंतीं ( च्या अवशेषां ) वरूनही दिसतें. वाडा पश्चिमाभिमुख होता. ह्या वाड्यासमोर महादेवाचें दगडी लहानसें देऊळ आहे. त्या देवळांत तुकोबा अनेक वेळ शिवजीबरोबर बोलत बसत. शिवजीजवळ ५०० बैल होता. व कथील, शिशें, भांडीं, पत्रे वगैरेंचा त्याचा मोठा व्यापार होता. तुकोबाचे वेळीं पुणेंवाडी कसबें लोहगांवाखालीं होती. गांवांत तुकोबाचें देऊळ आहे. ह्या



लोहगव्हाशिवाय तुकोबांचें असें स्वतंत्र देऊळ अन्यत्र कोठेंही नाहीं. पुणेंवाडीच्या बाजूनें गांवांत शिरतांच कासार-विहीर लागते. ती मोठी भव्य असून रमणीय आहे. पूर्व, पश्चिम व दक्षिण ह्या तीनही बाजूंस तीन तीन कोनाडे असून ४०।५० ब्राह्मण संध्या करावयास बसतील अशी सुंदर चौफेर जागा विहिरींतच आहे. विहिरींत दक्षिणच्या बाजूस शिलालेख कोरला आहे. तो शके १५३४ मधील आहे. शिलालेखावर तागडीचें निशाण आहे. मुख्य मधला शिलालेख सुवाच्य आहे. बाजूचीं कांहीं अक्षरें लागत नाहींत.

॥ श्रीगणेशायन माग्र काळीका येन्म ( फुटले )
श्रीशालीवाहन शके १५३४ परीध...
वीशंवछरे कार्तिक वदी तीज आत...
रतदीनी सीउजी व काळोजी पीता केशो
जी माता रंभाई वंश थीटे शोमवंशी
कासार कसबे लोहोगांव श्रीरस्तु:

शिलालेखांत ज्या सीउजी व काळोजी ह्या मृतपितृक भावांचा उल्लेख आहे त्यांनीं ती विहीर बांधिली. वरील वर्णनावरून ती विहीर बांधण्याचें काम कित्येक वर्षें चालावयास हवें आणि तिच्यापायीं कित्येक सहस्र रुपयांचा व्ययही व्हावयास हवा. असलें काम इष्टापूर्तकर्म करण्याची बुद्धि होण्यास आणि तें पार पाडण्याची शक्ति अंगीं असण्यास त्या भावांचीं वयें काय असावींत ? तुकारामबोवा जर शके १५३० त जन्मले तर वयानें त्यांच्या बरोबरीचे असण्यापेक्षां लहान असण्याचाच संभव अधिक,असे हे त्यांचे शिष्य सीउजी केव्हां जन्मलेले मानावयाचे ? वरील सारखें काम करण्याचा उद्देश उत्पन्न होण्यास व तें पार पाडण्याची उमेद बाळगून पार पडलेले पाहणारा गृहस्थ सहज ३०।३५ चा असलाच पाहिजे. म्हणजे सीउजीचें जनन शकाब्द १५०० च्या आसपासचेंच असलें पाहिजे,आणि तुकारामाचेंही त्याच्याच जवळच्या किंवा दहाबारा वर्षें आधींच्याही काळचें असण्याचा संभव विशेष बलवत्तर ! आणि तसा तो असल्याबद्दलचे कांहीं लेखही बरेच जुने असे आढळतातही. त्यांतीलच एक, आजला जी पोथी लिहून शेंकड्यावर वर्षें निःसंशय झालीं आहेत आणि जी पंढरपुराकडील तुकारामशिष्यशाखेंतीलच आहे अशा एका, ज्ञानेश्वरीच्या पोथीच्या मलपृष्ठावरील तुकोबांच्या वंशावळींत अढळतो. तेथें तो शके १४९० असा दिलेला आहे. दुसरा एक संभाव्य शक कविचरित्रकार देतात तो शक १५१० हा होय. शकाब्द १४९० हा शकांक रा. राजवाडे यांच्या संग्रहांतील पोथीवरील वंशावळींत असलेला ह्या लेखकानें पाहिलेला आहे. कविचरित्रकार जो १५१० शकांक देतात तो कशाच्या आधारावर हें समजण्यास आज कांहींच मार्ग नाहीं. अन्यत्र प्रत्यक्ष देहूकडील परंपरेंतील लोकसंग्रहांतील तुकारामांच्या अभंगाच्या गाथ्यांच्या वह्यांतून किंवा स्वतंत्र ज्या तुकोबांच्या वंशावळी आढळतात त्यांतून क्वचित् शकाब्द १५२० ही आढळतो. त्याचप्रमाणें चार दोन ठिकाणीं जन्ममास, तिथि आणि वार हींही आढळतात. आणि तीं माघ शुक्ल ५ मी गुरुवार म्हणून. तेव्हां आतां आपणांस जो विचार करावयाचा तो शकाब्द १४९० किंवा शकाब्द १५१० ह्या दोनच शकाब्दांचा. कारण शकाब्द १४९० हा जन्मशक धरिल्यास तुकोबांचे मरणसमयींचें वय ८१ वर्षांचें येतें. तें जरी असंभाव्य किंवा अश्रद्धेय दिसत नाहीं तरी त्या मागील १५।२० वर्षांतीलच त्यांची सर्व संतति मानवी लागते. म्हणजे तुकोबांच्या वयाच्या ६०।६५ पासून द्वितीय संबंधाच्या कुटुंबाकडून त्यांना संतति व्हावयास लागली, आणि ती मरणसमयींच्या ८१ व्या वर्षींही होऊं शकली, ही गोष्ट बरीचशी अश्रद्धेय खरी ! असा प्रकार जन्मशक १५१० मानिल्यास कांहीं होत नाहीं. आणि शकाब्द १५१० पासून शकाब्द १५७१ पर्यंत म्हणजे ६० वर्षांचें आयुर्मान तुकाराममहाराजांच्या चरित्रांतील सर्व गोष्टी अडचणींवांचून मावण्यास पुरेसेंही आहे. तेव्हां माघ शुक्ल ५ गुरुवार ही जयंतीतिथि आणि माघशुक्ल १० गुरुवार ही द्वितीयोपदेशतिथि ह्यांच्या मेळानें जी पंचांगगणिताशीं जुळती येईल तीच त्यांची सशकाब्द जन्मतिथि खरी मानणें इतिहासाच्या सशास्त्र संशोधनपद्धतीस पटेल. शकाब्द १५१० त माघ शुक्ल पंचमीस गुरुवार आहे. तो शकाब्द १४९० च्या किंवा १५३० च्या माघ शुक्ल पंचमीस नाहीं. शकाब्द १५१० हा प्रथमच्या नवनीतावृत्तींत (शके १७७६) परशुरामपंततात्यांनीं



दिलेला आहे. तो चांगला दोन पिढ्या मान्य होता. (शके १७८२) कविचरित्रकारांनीं आपण तो परशुरामपंतांच्या संशोधकत्वावर विश्वासूनच घेतला असल्याचें लिहिलें आहे. महिपतीचा ग्रंथ ह्यानंतर प्रसिद्ध झाला—म्हणजे मुद्रित होऊन आधुनिकांच्या वाचनांत आला. तेव्हां तदभावीं परशुरामतात्यांनीं दिलेला शक निःसंशय देहू, पुणें येथीलच एखाद्या जुन्या लेखी आधारानेंच दिला असला पाहिजे असें म्हणण्यास बाध नाहीं. आधार त्यांनींही जसा दिलेला नाहीं तसाच तो महिपतीनेंही दिला नाहीं, इतकेंच नव्हे तर त्यानें १५३० हा शकही कोठें उल्लेखिलेला नाहीं! तेव्हां त्याच्या अवान्तर उल्लेखांवरून कसा तरी मेळ घालून मानावा लागणारा १५३० हा तुकाराम-महाराजांचा जन्मशक, बाजूला सारून परशुरामपंत-तात्यांपासून दोन पिढ्या मान्य असणारा व जन्ममास-तिथींच्या वाराशीं जमणारा असा शकाब्द १५१० हाच खरा मानणें शास्त्रशुद्ध होय. हिंदुस्थानकथारस-कर्त्यांनीं(शके १८०८ पुढेंपर्यंतही)जो तुकारामजन्मशक दिला आहे तो १४८० असा असून मृत्युशक १५५० असा आहे. म्हणजे तुकारामाच्या सर्वायुष्याचें मान ७० पर्यंतचें येतें. अर्थात् ६०–७० वर्षांचें आयुष्य मानल्यावर तितक्या अवधींत त्याचें सर्व चरित्र बसतें; आणि तितकें शके १७७६ पासून तों १८०८ च्या पुढेंपर्यंतच्या सर्व विचारी लेखकांनीं मानिलेंच असल्यानें संशयास फारशी जागा नव्हती. अस्तु! आजच्या ह्या लेखानें तूर्त इतकेंच सिद्ध होतें कीं, **तुकाराम जन्मकाल शकाब्द १५१० माघ शुक्ल पंचमी गुरुवार** हा होय.

"यास स्वधर्मि राखुनि दे तुकया ईशनामभजनरुचि।
भक्तेष्टदानबळिं तुशिं तुळितां ते ऊन परिस सुरतरुची॥"

अशी त्या श्रेष्ठ भगवद्भक्तचरणीं विनंती करून लेखक विराम करीत आहे.

नारायण कृष्ण गद्रे.

---

# ज्ञानेश्वरी–उपमा.

[ ६३६ पृष्ठावरून पुढें चालू. ]

हें अपार कैसेनि कवळावें। महा तेज कवणें धवळावें। गगन मुठी सुआवें। मशकें केवीं॥७४॥

लोहाचें कनक होये। हें सामर्थ्य परिसींच आह। कीं मृतही जीवित लाहे। अमृतसिद्धि ॥७७॥ जरी प्रगटे सिद्धसरस्वती। तरी मुकया आथी भारती। एथ वस्तुसामर्थ्यशक्ती। नवल कायी। ७८। जयातें कामधेनु माय। तयासी अप्राप्त कांहीं आहे। म्हणवूनि मी प्रवर्तों लाहें। ग्रंथीं इये॥ ७९॥ आतां देइजे अवधान। तुम्हीं बोलविल्या मी बोलेन। जैसें चेष्टे सूत्राधीन। दारुयंत्र॥ ८१॥

नातरी वडवानळु सांदुकला। प्रलयवातें पोखला। सागरु शोषूनि उधवला। अंबरासी॥९०॥

पतिव्रतेचें हृदय जैसें। पतीवांचूनि न स्पर्शे। मी सर्वस्व यां तैसें। सुभटासी॥ १११॥

आधींच समुद्र पाहीं। तेथ दुवाडपण कवणा नाहीं। मग वडवानळु तैसेयाही। विरजा जैसा।।११७॥ ना तरी प्रलयवन्हि महावातु। या दोघां जैसा सांघातु। तैसा हा गंगासुतु। सेनापती॥ ११८॥

जिया उत्तम कुळींचिया होती। आणि गुणलावण्य आथी। तिया आणिकीतें न सांहती। सुतेजपणें॥१८६॥ नवियें आवडीचेनि भरें। कामुक निज वनिता विसरे। मग पाडेंवीण अनुसरे। भ्रमला जैसा॥१८७॥ कीं तपोबळें ऋद्धी। पातलिया भ्रंशे बुद्धी। मग विरक्तासिद्धी। आठवेना॥ १८८॥

जैसा भ्रमरु भेदी कोडें। भलतैसें काष्ठ कोरडें। परि कळिकेमाजि सांपडे॥ कोंवळिये।२०१॥

---



# भगवद्गीतेंतील योगक्षेम.

[रा. ब. डॉ. प्रभाकर रामकृष्ण भांडारकर बी. ए. एल्. एम्. एस्.]

कृपावंत किती । दीनें बहु आवडती. १
त्यांचा भार वाहे माथां । करी योगक्षेमचिंता. २
भुलों नेदी वाट । करीं धरुनी दावी नीट ३
तुका म्हणे जीवें । अनुसरतां एका भावें. ४

या अभंगांत साधुवर्य तुकोबांनीं भगवद्गीतेंतील पुढील श्लोकाचा अनुवाद केला आहे हें उघड आहे.

अनन्याश्चिन्तयन्तो मां ये जनाः पर्युपासते ।
तेषां नित्याभियुक्तानां योगक्षेमं वहाम्यहम् ॥

या श्लोकावरील ज्ञानेश्वरांच्या टीकेंत पुढील ओव्या आहेत:--

ऐसें अनन्यगतिकें चित्तें । चिंतितसांत मातें । जे उपासिती तयांतें । मीचि सेवीं ॥ ३३७ ॥ ते एकवटूनि जिये क्षणीं । अनुसरले गा माझिये वाहणीं ॥ तेव्हांचि तयांची चिंतवणी । मजचि पडली ॥ ३३८ ॥...................... आपुली तहान भूक नेणें । तान्हया निकें तें मायेसीचि करणें । तैसे अनुसरले मज प्राणें । तयांचेन काइसेनिहि न लजें मी ॥ ३४० ॥ तयां माझिया सायुज्याची चाड । तरि तेंचि पुरवीं कोड । कां सेवा म्हणती तरी आड । प्रेम सुयें ॥३४१॥ ऐसा मनीं जो जो धरिती भावो । तो पुढां पुढां लागें तयां देवों । आणि दिधलियाचा निर्वाहो । तोही मीचि करीं ॥ ३४२ ॥ हा योगक्षेम आधवा । तयांचा मजचि पडला पांडवा । जयांचिया सर्व भावा । आश्रो मी ॥ ३४३ ॥

वरील अभंगांतील व या ओव्यांतील कांहीं शब्दांचें साम्य असल्यानें असें संभवनीय आहे कीं, तुकोबांनीं भगवद्गीतेचा प्रत्यक्ष अनुवाद न करतां ज्ञानेश्वरीचा अनुवाद केला असेल. असो. ही गोष्ट मूळ व त्याचा अनुवाद यांविषयीं झाली. परंतु या ठिकाणीं विशेष विचार करावयाचा आहे तो हा कीं, गीतेंतील 'योगक्षेम' या शब्दाचा अर्थ काय ?

बहुतेक सर्व पूर्वीच्या आचार्यांनीं **योग** म्हणजे अप्राप्ताची प्राप्ति व **क्षेम** म्हणजे प्राप्तवस्तूचें रक्षण असा अर्थ केला आहे, व तो ऐहिक वस्तुपर असाच मानला आहे. अर्थात् अनन्यभक्तांचा संसार परमेश्वर चालवितो, आवश्यक वस्तु त्यांजपाशीं नसल्यास त्यांना त्या पुरवितो,व पुरविलेल्या वस्तूंचें रक्षण करतो, असें त्यांचें म्हणणें आहे.

अलीकडे[1] प्रो. वामन मल्हार जोशी यांनीं असें प्रतिपादन केलें आहे कीं, योगक्षेम या शब्दाचा शंकराचार्यादिकांनीं ऐहिक वस्तुपर केलेला अर्थ चुकीचा असून तो केवळ आध्यात्मिक कल्याणपरच केला पाहिजे. म्हणजे अनन्यभक्तांच्या फक्त आध्यात्मिक संपत्तींत परमेश्वर भर टाकतो व त्या संपत्तीचा सांभाळ करतो, असें म्हटलें पाहिजे. " कारण ' योगक्षेम' म्हणजे ' सांसारिक नित्य निर्वाह' असा अर्थ घेतला, तर श्रीकृष्णाचें हें वचन अनुभवाच्या कसोटीला उतरत नाहीं," व श्रीकृष्ण दोषी ठरतो. तेव्हां श्रीकृष्ण दोषी म्हणण्यापेक्षां शंकराचार्यादिकांचाच अर्थ चुकला असें म्हणणें योग्य. अर्थात् प्रोफेसर मजकुरांचा शंकराचार्यादिकांवर असा आरोप आहे कीं, योगक्षेम याचा भलताच अर्थ करून त्यांनीं श्रीकृष्णाच्या गळ्यांत दोष बांधला आहे.

यापुढें प्रोफेसर जोशी म्हणतात कीं, पूर्वग्रह जर सोडला तर काठकोपनिषदेंमधील पुढील मंत्रांत आपण सुचविलेला अर्थ सरळ लागू पडतो[2]:--

श्रेयश्च प्रेयश्च मनुष्यमेतस्तौ संपरीत्य विविनक्ति धीरः । श्रेयो हि धीरोऽभिप्रेयसो वृणीते प्रेयो मन्दो योगक्षेमाद् वृणीते ॥

---

१. विविधज्ञानविस्तार, पु. ५१, अं. ४, पृ. ११३.

२. येथें कबूल करणें भाग आहे कीं, कैक वर्षांपूर्वी या मंत्रावर प्रवचन करीत असतां प्रस्तुत लेखकानेंही, अज्ञानामुळें, प्रोफेसर मजकुरांसारखाच ' सरळ ' अर्थ केला होता.





अनुक्रमणिका

परंतु या स्थळींही पूर्वीच्या आचार्यांनीं योगक्षेम याचा अर्थ श्रेय असा न करतां ऐहिकपरच केला आहे, व तो चुकीचा आहे असें वाक्यरचनेच्या आधारें दाखविण्याचा प्रोफेसर जोशी यांनीं यत्न केला आहे. त्यांनीं दाखवून दिलेलें प्रमाण इतकें सरळ आहे कीं, तें साधारण बुद्धीच्या माणसाच्या सुद्धां सहज ध्यानांत येण्यासारखें आहे. मग शंकराचार्यादिकांसारख्या कुशाग्रबुद्धि माणसांच्या लक्षांत तें आलें नसावें हें संभवत नाहीं. असें असून हे आचार्य योगक्षेम याचा अर्थ ऐहिककल्याणपर कां करतात? शंकराचार्यादिकांचा अर्थ चुकीचा असें म्हणण्याचें धाडस करण्यापूर्वीं या गोष्टीचा विचार प्रोफेसर मजकुरांनीं विनयपूर्वक केला पाहिजे होता असें मला वाटतें. ते कदाचित् म्हणतील कीं, शंकराचार्यादिकांनीं या काठकोपनिषदेंतील मंत्रांत योगक्षेम याचा अर्थ ऐहिक कल्याणपर केला आहे, त्याचें कारण पूर्वग्रह. परंतु या म्हणण्यांत कांहीं अर्थ नाहीं; कारण कोणत्याही शब्दाचा जो अर्थ आपण व्यवहारांत करतों त्याचें कारण पूर्वग्रह हेंच आहे. उदाहरणार्थ, साधारणतः कोणीही मनुष्य पूर्वग्रहानें विष याचा अर्थ जहर आणि क्षय याचा अर्थ नाश असाच करणार; आणि विशेषस्थलीं या शब्दांचा अर्थ अनुक्रमें पाणी व गृह आहे असें कोणास म्हणावयाचें झाल्यास त्याबद्दल आधार दाखवून देण्याची जबाबदारी असें म्हणणाऱ्यावर आहे. अर्थात् काठकोपनिषदेच्या मंत्रांतील योगक्षेम या शब्दाचा अर्थ आध्यात्मिक आहे असें कोणास प्रतिपादन करणें असल्यास त्यानें प्रथमतः समकालीन अथवा तत्पूर्वीच्या वाङ्मयांतून अशा अर्थी या शब्दाचा प्रयोग केल्याचें किमानपक्षीं एक तरी उदाहरण दिलें पाहिजे. तरच वाक्यरचनेच्या आधारावरून विवक्षित स्थळीं तोच अर्थ केला पाहिजे असें म्हणण्याचा हक्क त्याला पोंचतो. केवळ वाक्यरचनेच्या आधारावर एखाद्या शब्दाचा पूर्वी कधीं ठाऊक नसलेला असा नवीन अर्थ केला असतां तो कोणाही समंजस माणसास पटावयाचा नाहीं. योगक्षेम याचा आध्यात्मिक वस्तुपर अर्थ करण्यास या प्रकारचा आधार प्रोफेसर जोशी यांनीं दाखवून दिलेला नाहीं. किंबहुना ऋक्सं. १० मं. १६६ सू. ५ ऋक् यांत जो योगक्षेम शब्द आढळतो तो उघडपणें दृष्टफलपरच असल्यानें त्यांस प्रतिकूल आहे. परंतु जरी यदाकदाचित् योगक्षेम या शब्दाचा अध्यात्मिक वस्तुपर प्रयोग केला आहे असें स्थळ भगवद्गीतेबाहेर आढळलें तरीही खास भगवद्गीतेंत तो अर्थ लागू करण्यास अत्यंत मोठी अडचण आहे. ती अशी कीं, त्या ग्रंथांत पुढील वचन आहे:—

त्रैगुण्यविषया वेदा निस्त्रैगुण्यो भवार्जुन।
निर्द्वन्द्वो नित्यसत्त्वस्थो निर्योगक्षेम आत्मवान्॥

या ठिकाणीं योगक्षेम या शब्दाचा अर्थ निःसंशय दृष्टफलपर आहे. तेव्हां अशा विशिष्ट शब्दाचा अर्थ गीतेंतच दुसऱ्या एका स्थळीं याहून भिन्न प्रकारें करण्यास फारच मोठा प्रत्यवाय आहे हें कोणालाही कळण्यासारखें आहे. आणि तसाच कांहीं सबळ आधार दाखविल्यावांचून असला प्रकार सुज्ञांस मान्य होणें शक्य नाहीं. या संबंधांत प्रोफेसर जोशी म्हणतात कीं–' योगक्षेम ' म्हणजे ' श्रेयस् ' असा अर्थ धरून निर्योगक्षेम म्हणजे " ज्यांचें श्रेय निश्चित झालें आहे " असा अर्थ करतां येईल; तथापि येथें योगक्षेमाचा अर्थ पूर्वपरंपरेला धरूनच करणें मला एकंदरींत बरें वाटतें. ' एकंदरींत बरें वाटतें! ' ' निस्त्रैगुण्य म्हणजे ज्याचें त्रैगुण्य नष्ट झालें आहे असा अर्थ करितां येईल, तथापि ज्याचें त्रैगुण्य नष्ट झालें आहे असाच अर्थ करणें मला एकंदरींत बरें वाटतें ' असें म्हणणें जितकें सयुक्तिक होईल तितकेंच प्रोफेसर जोशी यांचें हेंही म्हणणें सयुक्तिक आहे!

प्रोफेसर जोश्यांचा योगक्षेम याचा दृष्टफलपर अर्थ करण्यासंबंधांत जो आणखीं एक आक्षेप आहे तो असा कीं, पूर्वीच्या श्लोकांत " सकामबुद्धीनें यज्ञयागादि कर्में करणारांना स्वर्गप्राप्ति होते खरी, पण त्यांना पुण्य संपल्यावर पुनः खालीं यावें लागतें असें......सांगितल्यावर, अनन्यबुद्धीनें नित्य ईश्वरभक्ति करणारांस कोणती गति प्राप्त होते?–हा प्रश्न सहज उत्पन्न होतो; व त्याचें उत्तर अर्थात् असेंच असलें पाहिजे कीं, अशा निष्काम व नित्याभियुक्त भक्तांना स्वर्गाच्या यातायातीहून कांहीं तरी उच्चतर मिळतें. हें उच्चतर म्हणजे काय? पोटाला अन्न आणि कमरेला वस्त्र? हें उच्चतर म्हणजे काय?–सांसारिक



स्वास्थ्य ? हें उच्चतर म्हणजे ऐहिक योगक्षेम ? जो असें म्हणेल तो अरसिक म्हटला पाहिजे. " प्रोफेसरांची ही विचारसरणि निर्दोष आहे हें कोणीही कबूल करील. परंतु त्यांची चूक झाली आहे ती ही कीं, ज्याप्रमाणें सकामबुद्धीनें यज्ञयागादि करणारांना स्वर्ग हें फल त्याप्रमाणें नित्याभियुक्त जनांना (ऐहिक) योगक्षेम हें फल, असा या श्लोकांचा अर्थ होतो असें ते समजतात. परंतु असा त्यांचा अर्थ नाहीं.अशा लोकांना जें उच्चतर कांहीं तरी फल मिळालें पाहिजे असें प्रोफेसरांचें सयुक्तिक म्हणणें आहे तें योगक्षेम हें नसून तें कोणतें हें पुढील बारा श्लोकांत उघड करून सांगितलें आहे. तें असें–' यान्ति मद्याजिनोऽपि माम् ' ( माझें यजन करणारे मजप्रत येतात ), 'यान्ति परां गतिम्' ( ते उत्तम गतीप्रत जातात). व शेवटीं श्रीकृष्ण अर्जुनास सांगतात कीं ' मामेवैष्यसि युक्त्वैवमात्मानं मत्परायणः ' ( याप्रमाणें तूं मजशीं योग केल्यास मत्परायण होत्साता मजप्रत येशील ). सारांश, स्वर्गाच्या यातायातीहून उच्चतर असें जें कांहीं अनन्य भक्तास मिळतें तें योगक्षेम नव्हे, तर भगवत्स्वरूपप्राप्ति. आतां प्रश्न एवढाच राहिला कीं, मध्येंच जें वाक्य आलें आहे कीं अशा नित्याभियुक्तांचा मी योगक्षेम वाहतों त्याचा संबंध कोठें ? याचें उत्तर असें कीं, कोणी म्हणेल कीं, अनन्यनित्याभियुक्त भक्त होणें हें अशक्य आहे. कारण त्यांनीं जर ईश्वराव्यतिरिक्त कोणत्याही गोष्टीचें चिंतन केलें नाहीं तर त्यांची संसारयात्राच चालावयाची नाहीं. त्यावर श्रीकृष्ण म्हणतात कीं, त्यांच्या संसारांतील योगक्षेमाचा भार आपण वाहतों.

योगक्षेम या शब्दाचा अर्थ आध्यात्मिक वस्तुपर पूर्वी कोणी केला नाहीं असें नाहीं.ख्रिस्ती सनाच्या दहाव्या अकराव्या शतकांतील **अभिनव गुप्ताचार्यांनीं** या श्लोकाची व्याख्या करतांना स्पष्ट म्हटलें आहे कीं, ' योगोऽप्रतिलब्धमत्स्वरूपलाभः । क्षेमं प्राप्तभगवत्स्वरूपप्रतिष्ठालाभपरिरक्षणं येन योगभ्रष्टत्वशङ्कापि न भवेदित्यर्थः । ' ( योग म्हणजे अप्राप्त जें माझें स्वरूप त्याचा लाभ. क्षेम म्हणजे भगवत्स्वरूपप्राप्तिरूप जो लाभ त्यावें रक्षण. म्हणजे योगभ्रष्टत्वाची शङ्काही उरूं नये. ) ज्ञानेश्वरींतही हाच अभिप्राय उघड आहे. वामनाच्या यथार्थदीपिकेंत ऐहिक व पारमार्थिक असा दोहों प्रकारचा योगक्षेमाचा अर्थ केलेला दिसतो. तुकोबांनीं वरील अभंगांत पारमार्थिक अर्थ केलेला उघडच आहे.कदाचित् त्यांत ऐहिक दृष्टीचाही समावेश झाला असेल. परंतु शंकराचार्यांसारख्या कुशाग्रबुद्धीच्या विद्वानांनीं ऐहिकदृष्ट्याच अर्थ केला आहे, आणि तोच योग्य होय, हें आतांपर्यंत केलेल्या विवेचनावरून स्पष्ट होईल.

आणखीं एक गोष्ट विचार करण्यासारखी आहे. प्रो. जोशी म्हणतात कीं, 'सर्व आचार्य, आचार्यभक्त, हरिभक्तिपरायण, हरिदास पुराणिक, वक्ते, लेखक, योगक्षेम याचा अर्थ ऐहिक वस्तुपरच करतात. एतद्देशीय कवि व साधुसंतही सांगत आले आहेत कीं,

येन शुक्लीकृता हंसाः शुकाश्च हरितीकृताः।
मयूराश्चित्रिता येन स ते वृत्तिं विधास्यति ॥

चिंता सर्वांची हरिला ॥ ध्रु. ॥ पक्ष्यापदरीं संचय कैंचा । चारा पुरवि तयाला ॥ चिंता० ॥ १ ॥ किडी मुंगी कांहीं मागत नाहीं । साखर देइ तयांला ॥ चिंता ० ॥ २ ॥ अमृत म्हणे हरिघरिं काय उणें । जो मागे देइ तयाला ॥ चिंता ० ॥ ३ ॥

नित्य उठोनियां खायाचीच चिंता । आपुल्या तूं हिता नाठविसी ॥ १ ॥ जननीचे पोटीं उपजलासी जेव्हां । चिंता तुझी तेव्हां केली तेणें ॥ २ ॥ चातकालागूनि मेघ नित्य वर्षे । तो तुज उदास करील केवीं ॥ ३ ॥ पक्षी वनचरें आहेत भूमीवरी । तयांलागीं हरी उपेक्षीना ॥ ४ ॥ तुका म्हणे भाव धरुनि राहें चित्तीं । तरि तो श्रीपति उपेक्षीना ॥ ५ ॥

येशू ख्रिस्तासारख्या परदेशीय साधुसंतांनीं याच प्रकारच्या उक्ति काढल्या आहेत.या सर्व प्रकारावरून सरळ अनुमान असें निघत नाहीं काय, कीं भगवद्गीताकाराच्या मनांतही हाच अर्थ होता ? परमेश्वरभक्तांचा ( ऐहिक ) योगक्षेम चालवितो हें विधान योग्य, सत्य अथवा अनुभवास पटणारें असो वा नसो, त्याचा पाहिजे तर वेगळा विचार करावा. परंतु तें निःसंशय धार्मिक लोकांत सर्वमान्य आहे. यावरून गीताकारांसही तें मान्य असावें, असें कोणासही साहजिकपणें



अनुक्रमणिका

वाटलें पाहिजे. प्रोफेसर साहेब म्हणतात कीं, "गीतें-तील वचनें खोटीं आहेत असें म्हणावेंसें मला मुळींच वाटत नाहीं. माझी आपली खरीखुरी अशी श्रद्धा आहे कीं, व्यासासारख्या आद्य ऋषींची वाणी ही कधीं अनृत नसावयाची. त्यांना दिव्य प्रकाश लाभलेला होता. स्वानुभवाच्या चाळणींतून गाळून शुद्ध ठरलेलेच उद्गार त्यांच्या मुखांतून बाहेर पडावयाचे * हीच बुद्धि ( मग ती योग्य असो अथवा अयोग्य असो ) एतद्देशीय कवि, साधुसंत व साधारण धार्मिक जन यांचीही आहे. परंतु हे अर्थ समजतात एक, व प्रोफेसर साहेब समजतात दुसरा. दोघां पक्षांपैकीं कोणीतरी एक चुकत आहे हें खास. याप्रमाणें 'आद्य ऋषींची वाणी'च समजण्याची जर त्यांच्या भक्तांस पंचाईत,तर ती कधींही अनृत नसावयाची या श्रद्धेंत तरी अर्थ तो काय ? सूक्ष्मदृष्टीनें विचार करणाऱ्यास सहज कळण्यासारखें आहे कीं, या स्थळीं व्यासाच्या वचनावरील श्रद्धेपेक्षां प्रोफेसर साहेबांची आपल्या विवेकबुद्धीवर अधिक श्रद्धा आहे. आणि म्हणूनच इतर श्रद्धावंतांचा अर्थ सोडून देऊन त्यांनीं व्यासवचनांतून आपल्या विवेकबुद्धीस इष्ट असा अर्थ काढण्याचा यत्न केला आहे. अर्थात् हा प्रकार आधुनिक वेदभाष्यकार दयानंदस्वामी यांच्या धरतीचा आहे असे म्हणावें लागतें. खऱ्या शोधकबुद्धीच्या भाविक मनुष्याची दृष्टि याहून भिन्न असते. त्याची असें म्हणण्याची सिद्धता असते कीं, "अमुक एका वाक्याचा खरा अर्थ असा आहे असें वाटतें व त्याचीं अशीं अशीं प्रमाणें आहेत; माझें म्हणणें चुकीचें व दुसऱ्यांचें खरें असल्यास तो अर्थ माझ्या अनुभवास पटत नाहीं, अतएव माझ्या दृष्टीनें ग्रंथकाराची ही चूक होय." अशी दृष्टि नसल्यास शोधक बुद्धीचा समतोलपणा कदापि राहूं शकत नाहीं, व ओढाताण करण्याकडे साहजिकपणें स्वतःस न कळतां प्रवृत्ति होते. सर्वमान्य ग्रंथांत एखाद्या स्थळीं अशा प्रकारें मतभेद झाल्यानें त्या ग्रंथाविषयीं पूज्यबुद्धि नष्ट होण्याचें कारण नाहीं. परमेश्वरानें सर्व सत्य एकाच काळीं एका विवक्षित ऋषीस अथवा अन्य एखाद्या मनुष्यास प्रकट केलें असा कोठेंही अनुभव नाहीं. तो स्वतः काय तो एक पूर्णज्ञानी. मग 'नैको मुनिर्यस्य मतं प्रमाणम्'-असें म्हटल्यानें ऋषिमुनींविषयींचा जो योग्य आदर व पूज्यभाव त्यांत अंतर पडण्याचें कांहीं कारण नाहीं.

येथवर या विषयाचा शास्त्रीय दृष्टीनें विचार झाला. कोणाच्या मनांत अशीही शंका येण्यासारखी आहे कीं हें विवेचन करण्यासाठीं एखादी साहित्य-सभा अधिक योग्य स्थळ झालें असतें. परंतु योगक्षेम याचा शंकराचार्यादिकांना अभिप्रेत जो अर्थ त्यावर प्रो. जोशी- यांचा आणखीं एक आक्षेप आहे, आणि त्याचा विचार करणें हें या धार्मिक संस्थेस उचित आहे. परंतु तें कार्य करण्यापूर्वी अनुषंगानें दुसऱ्या आक्षेपांस उत्तर देणें भाग झालें. एवढें सांगून या राहिलेल्या आक्षेपांचा विचार करूं.

प्रो. जोशी म्हणतात कीं--"पण 'योगक्षेम' शब्दाचा सामान्यतः जो अर्थ करण्यांत येतो त्या अर्थानें ईश्वरानें आपल्या भक्तांचा योगक्षेम चालविलेला आहे काय ? इतिहास-पुराणांत अनेक दुःखद प्रसंग प्रल्हाद-तुकारामादि साधुसंतांवर व ईश्वरभक्तांवर आल्याचें वर्णन आहे;......या प्रसंगांचा 'योगक्षेमा'मध्येंच अंतर्भाव करावयाचा असल्यास वेगळी गोष्ट. परंतु सामान्यतः आपण जो योगक्षेम या शब्दाचा अर्थ करतों, त्या अर्थानें त्यांचा योगक्षेम ईश्वरानें, कांहीं मर्यादित कालापर्यंत तरी, चालविला नाहीं हें उघड आहे. अर्जुनाला वनवासाला धाडलें व त्याच्यासारख्या शूराला बृहन्नडेचें रूप घ्यावयास लावलें;.... या सर्व गोष्टी ठाऊक असून ईश्वर 'योगक्षेम' चालवितो हें म्हणणें जरासें चमत्कारिकच नाहीं काय ?" बहुतेक सगळे लोक 'योगक्षेमा'चा अर्थ ऐहिक आहे असें मानतात. म्हणजे, त्यांच्या मतें, भक्ताला पलंग, गाद्यागिरद्या, मोटारकार्स, आइस्क्रीम, हीं जरी मिळालीं नाहींत तरी पोटभर अन्न व अंगभर वस्त्र मिळण्याची

* प्रोफेसर जोशी व्यासापर्यंतच जाऊन कां थांबले हें कळत नाहीं. ज्या वचनाचा विचार चालला आहे तें वचन प्रत्यक्ष भगवंतांच्या मुखांतील होय;करितां त्याच्या सत्यतेविषयीं संशय घेणें हें शुद्ध नास्तिक्य आहे असें विधान ठोकून दिलें असतें म्हणजे सर्वच कार्यभाग उरकला असता ! उलटपक्षीं रा. वै. का. राजवाडे यांचा लेख पहावा.




अनुक्रमणिका

त्याला कधीं पंचाईत पडावयाची नाहीं, असें श्रीकृष्णानें वचन दिलेलें आहे.

" योगक्षेमाच्या पूर्वपरंपरित अर्थाचाच स्वीकार करावा, तर ' योगक्षेमं वहाम्यहम् ' हें श्रीकृष्णाचें वचन अनुभवाच्या कसोटीनें खोटें ठरतें. कारण कांहीं भक्तांचा–चांगल्या चांगल्या भक्तांचा–योगक्षेम चालत नाहीं असें इतिहासपुराणांतील व स्वानुभवांतील उदाहरणांवरून स्पष्ट दिसतें. "

या आक्षेपास दोन प्रकारें उत्तर देतां येईल. एक सरळ प्रकार, म्हणजे खरोखरच ईश्वर अनन्यशरण भक्ताचें ( ऐहिक ) योगक्षेम चालवितो असें दाखवून देणें. दुसरा प्रकार विघातक टीकेचा. म्हणजे योगक्षेम याचा पारमार्थिक कल्याणपर अर्थ सुद्धां लागू पडत नाहीं असें दाखविणें. या दुसऱ्या प्रकाराचें अवलंबन प्रथम करणें सोईचें आहे. कारण, तेणेंकरून प्रथम प्रकाराचें विवरण पुढें करण्यास सोपें होईल.

प्रो. जोशी यांचें म्हणणें आहे कीं, भक्तांचा ऐहिक "योगक्षेम ईश्वरानें कांहीं मर्यादित कालापर्यंत तरी चालविला नाहीं, हें उघड आहे." पण आध्यात्मिक अर्थानें तरी त्यांचा योगक्षेम ईश्वर कोठें चालवितो आहे ? युधिष्ठिर एवढा भक्त, परंतु सत्यकंचुक अनृत बोलतेवेळीं त्याचा रथासह अधःपात झाला त्यावेळीं पारमार्थिक क्षेमाचा भार ईश्वरानें कोठें वाहिला ? " भीमाला बल्लवाचार्य बनवून पोळ्या लाटण्यास लावलें." होय. परंतु, दुर्योधनाच्या मांडीवर गदा मारण्यास जेव्हां तो प्रवृत्त झाला तेव्हां तरी त्या अधर्मापासून देवानें त्याचें रक्षण केलें काय ? " अर्जुनाला वनवासाला धाडलें व त्याच्यासारख्या शूराला बृहन्नडेचें रूप घ्यावयास लावलें." खरी गोष्ट. परंतु ज्या अर्जुनाचा एवढा योग कीं, दशम पदीं निग्रह करून प्रत्यक्ष कृष्णाला त्यानें अधर्मापासून परावृत्त केलें, व ज्या असत्यास युधिष्ठिरसुद्धां बळी पडला त्यापासून अलिप्त राहिला, त्याच अर्जुनाला जेव्हां विरथ कर्णाबरोबर युद्ध करण्याचा मोह झाला तेव्हां त्याची पारमार्थिक क्षेमचिंता परमेश्वरानें केली काय ? सारांश, प्रोफेसर साहेब म्हणतात कीं, परमेश्वर भक्तांचा ऐहिक योगक्षेम चालवितो, असें दिसत नाहीं म्हणून योगक्षेम याचा परमार्थपर अर्थ करावा. परंतु त्यांच्याच दृष्टीनें पाहतां परमेश्वर आपल्या भक्तांचा पारमार्थिक योगक्षेम चालवितो असेंही दिसत नाहीं. अर्थात् श्रीकृष्णास दोषमुक्त करण्याची प्रोफेसरांची युक्ति सफल झाली नाहीं, असें म्हणणें भाग पडतें.

प्रो. जोशी यांनीं स्वसमर्थनार्थ भीमार्जुनादिकांचीं उदाहरणें दिलीं आहेत. त्यामुळें, जसा आक्षेप तसें उत्तर या न्यायानें तींच उदाहरणें घेऊन त्यांचें म्हणणें सिद्ध होत नाहीं असें दाखविणें भाग पडलें. वस्तुतः भीमार्जुनादिकांस खऱ्या खुऱ्या अनन्यशरण भक्तांत ओढणें हें तात्त्विकदृष्ट्या योग्य नाहीं. तरी या जगतांत खरोखरी एका काळीं ज्यांचा वास होता अशा भक्तांचा आपण विचार करूं. तुकारामाचें उदाहरण प्रो. जोशी यांनीं घेतलेलें आहे. त्यांच्या तरी पारमार्थिक योगक्षेमाचा भार परमेश्वरानें सदासर्वकाल वाहिला होता काय ? जर वाहिला असता तर त्याच्या पुढील उद्गारांची वाट काय ?:

( क ) बळें बाह्यात्कारें संपादिलें सोंग ।
नाहीं झाला त्याग अंतरींचा ॥

( ख ) चतुर मी झालों आपुल्या भोंवता ।
भावेंवीण रिता फुंज अंगीं ॥ १ ॥
आतां पुढें वायां जावें हें तें कायी ।
कामक्रोधें ठायीं वास केला ॥ २ ॥

( ग ) माझा तुम्ही देवा केला अंगिकार ।
हें मज साचार कैसें कळे ॥ १ ॥
कां हो कांहीं माझ्या न ये अनुभवा ।
विचारतां देवा आहें तैसा ॥ २ ॥
..............................
तुका म्हणे नाहीं पालट अंतरीं ।
तेथें दिसे हरि ठकाठकी ॥ ४ ॥

सारांश, तुका म्हणे गुरें राखोनी गोवारी । माझीं म्हणे परी लाभ नाहीं ॥ असें म्हणण्याचा प्रसंग तुकोबांवर कां यावा ? आधींच हीन याती, त्यावर संतांनीं स्तुति केली, त्यावेळीं गर्व व अहंकार कां उत्पन्न व्हावा ? पोथ्या बुडवून बसल्यावर लोकांनीं फजिती केली तेव्हां तुकोबांनीं देवावर संकट घातलें व त्याचा अंत पाहिला हें काय भगवंतांनीं त्यांचें आध्यात्मिक क्षेम चालविलें म्हणावयाचें ? हीच गोष्ट येशू ख्रिस्ताची.





अनुक्रमणिका

देवावर त्याची अनन्यभक्ति. परंतु क्रुसावर चढविल्यावर मरणसमयीं त्याचा देवावरचा निर्भर विश्वास डळमळला, व ' देवा, माझ्या देवा, कां तूं मला मोकलिलेंस ? ' असा त्यानें उद्गार काढला. "या प्रसंगांचा [ प्रोफेसरांच्या अर्थाप्रमाणें ] 'योगक्षेमा'मध्येंच अंतर्भाव करावयाचा असल्यास गोष्ट वेगळी. " परंतु जर कां या अर्थानें क्षेम परमेश्वरानें चालविलें असतें तर अशा समयींही येशूच्या मुखांतून सेंट ल्यूकमध्यें आढळणारी पुढील उक्ति निघाली पाहिजे होती ' पित्या, मी तुझ्या हातांत माझा आत्मा समर्पण करतों. ' *

सारांश, श्रीकृष्णास दोषमुक्त करण्यासाठीं प्रो. जोशी यांनीं सुचविलेला योगक्षेम याचा अर्थ अपेक्षित कार्य करूं शकत नाहीं. कारण त्यांच्या दृष्टीनें विचार केला असतां परमेश्वर अनन्य भक्तांच्या ऐहिक योगक्षेमापेक्षां आध्यात्मिक योगक्षेम अधिक चांगल्याप्रकारें चालवितो, असें दिसत नाहीं.

येथवर विध्वंसक टीका झाली. विधायक टीका करावयाची म्हणजे प्रथमतः असें म्हटलें पाहिजे कीं, या प्रकरणाचा ज्या दृष्टीनें वर विचार केला आहे ती दृष्टीच मुळीं चुकीची आहे. परमेश्वर अनन्यगतिक भक्तांच्या पारमार्थिक संपत्तीचा योगक्षेम चालवितो यांत कांहीं संशय नाहीं. मात्र जोंपर्यंत भक्तांच्या ठायीं अनन्यगतिकता पुरी बाणली नाहीं तोंपर्यंत या संपत्तीस चढ उतार असतो. तुकारामादिकांसारखे जे आत्मपरीक्षणपटु साधु, ज्यांनीं आपल्या बारीकसारीक दोषांकडेही डोळेझांक न करतां ते बाहेर उजेडांत आणले, ज्यांना एका काळीं परमेश्वरकृपा न होतां आपण वायां जात आहों असें वाटलें, त्यांनीं अंतीं याबद्दल ग्वाही दिली आहे. परमेश्वरानें आपला अंगीकार केला आहे, आपल्या मरणानें देवानें स्वतः ठाणें बसविलें आहे, अशा प्रकारचे त्यांनीं अनेकदां उद्गार काढले आहेत. परंतु ही दशा त्यांना केव्हां प्राप्त झाली ? देवासाठीं सर्व संसाराची होळी केली असतांही त्याचा आपणावर कां अनुग्रह होत नाहीं असें म्हणण्यासारखी त्यांच्या मनाची स्थिति असतांना काय ? नाहीं. ही अनन्यभक्तिच नव्हे. जेव्हां इतर सर्व वासना सोडून अत्यंत मनोनिग्रह करून देव हेंच माझें सर्वस्व म्हणून त्याच्याच प्राप्तीसाठीं यत्न केला, तेव्हां त्यांना ही परमगति मिळाली काय ? नाहीं. आपल्यापरी हरएक प्रयत्न करूनही परमेश्वरप्राप्ति होत नाहीं, व केवळ वळसे घेणें व डोंगरांची चढ उतार करणें यापलीकडे कांहींही पदरीं पडत नाहीं, असें जेव्हां त्यांच्या अनुभवास आलें, तेव्हां ते परमेश्वरास अनन्यभावें शरण गेले व ज्याप्रमाणें पूर्वी संसाराविषयीं निरासक्त झाले होते त्याप्रमाणेंच परमार्थाविषयीं निरासक्त होऊन "देवा ! तुला कळेल तें कर, तारशील तर तार, मारशील तर मार, जवळ घे अथवा दूर धर " अशा प्रकारची त्यांची मनोवृत्ति झाली.

माझा घातपात अथवा हित फार । अवघा विचार तुझ्या हातीं ॥ १ ॥ ठेवुनि जीव भाव तुझ्या ठायीं चित्त । राहिलों निश्चिंत पांडुरंगा ॥ २ ॥ चित्ताचा चाळक बुद्धीचा जनिता । काय नाहीं सत्ता तुझे हातीं ॥ ३ ॥ तुका म्हणे काय करिसी तें पाहीन । ठेवसी राहीन सुखें तेथें ॥ ४ ॥

ही खरी अनन्य भक्ति. आणि देवानेंही उचित तेंच केलें. तुकोबांस कळून चुकलें होतें कीं—

काय फार जरी जालों मी शाहाणा । तरी नारायणा नातुडसी ॥ १ ॥ काय जालें जरी मानी मज जन । परि नातुडती चरण तुझे देवा ॥ २ ॥ काय जालें जरी जालों उदासीन । परि वर्म भिन्न तुझें देवा ॥ ३ ॥ काय जालें जरी केले म्यां सायास । म्हणवितों दास भक्त तुझा ॥ ४ ॥ तुका म्हणे तुज दाविल्यावांचून । तुझें वर्म कोण जाणे देवा ॥ ५ ॥

* येशूची प्रथम सांगितलेली मरणसमयींची उक्ति म्याथ्यू व मार्क यांच्या शुभवर्तमानांत आहे. हे ग्रंथ बहुतांशीं अधिक विश्वसनीय आहेत. येथें एवढें सांगणें आवश्यक आहे कीं, जरी प्रथम उक्ति सकृद्दर्शनीं न्यूनत्व आणणारी दिसते व तीच खरी असावी अशी माझी समजूत आहे, तरी तेणेंकरून येशूसंबंधीं कोणाचीही पूज्यबुद्धि रतिभरसुद्धां कमी होण्याचें कारण नाहीं. किंबहुना तीच उक्ति विशिष्ट वाचकांस अधिक सुपरिणामकारक व्हावी असें मला वाटतें परंतु या गोष्टीचा अधिक ऊहापोह करण्याचा हा प्रसंग नव्हे.



श्रुतिही अशीच आहेः--

'नायमात्मा प्रवचनेन लभ्यो न मेधया न बहुना श्रुतेन । यमेवैष वृणुते तनूं स्वाम् ॥' परमेश्वरानें अनुग्रह केला व तुकोबांच्या ठायीं त्यानें आपलें ठाणें बसविलें.

जी गोष्ट पारमार्थिक योगक्षेमाची तीच ऐहिक योगक्षेमाची. सर्वांचेंच ऐहिक योगक्षेम परमेश्वर चालवीत आहे, मग ते भक्त असोत कीं अभक्त असोत. फरक एवढाच कीं, साधारण मनुष्य समजतो कीं स्वतःच्या शक्तीनें हें कार्य आपण करीत आहें व अनन्यभक्त समजतो कीं हें कार्य परमेश्वर करीत आहे. कारण संसारयात्रेसाठीं करावीं लागणारीं कर्में अनन्यभक्त करतो तीं योगक्षेमाच्या आशेनें नव्हे, तर केवळ परमेश्वरानें तीं लावून दिलीं आहेत म्हणून. भक्ताला राज्य देईन, कीं 'पोटभर अन्न व अंगभर वस्त्र' देईन, कीं त्यांतही कमी करीन, याविषयीं श्रीकृष्णानें कांहींच वचन दिलेलें नाहीं. यासंबंधीं चिंता करण्याचें काम भक्ताचें नव्हे, तें मजकडे लागलें, एवढेंच त्याचें म्हणणें आहे. आणि जे कोणी खरे अनन्यभक्त झाले त्यांनीं या संबंधांत चिंता केली नाहीं एवढेंच नाहीं तर 'जो प्रभु कीन्हो सो भल मान्यो' अशीच त्यांची वृत्ति राहिली. जनकास राजपद प्राप्त झालें, परंतु त्यांत त्याला हर्ष नव्हता. मार्कस आरिलियस् यास बादशाही प्राप्त झाली, परंतु त्याच्या तोंडून उद्गार निघाला कीं, "राजवाड्यांतही योग्य रीतीनें आयुष्यक्रमण करणें शक्य आहे." जणूं काय ऐहिक संपत्ति हें सदाचरणास एक महाविघ्न ! याच्या उलट तुकोबांची स्थिति. परंतु त्यांनींही म्हटलें आहे कीं, 'न मिळो खावया न वाढो संतान.' आणि असें म्हणूनच ते उगे राहिले नाहींत, तर सर्व विपत्ति सहन करून त्या बऱ्याकरतांच आहेत असे उद्गार काढले आहेतः--

देव भक्तालागीं करूं नेदी संसार ।
अंगें वारावार करोनि ठेवी ॥ १ ॥
भाग्य यावें तरी अंगीं भरे ताठा ।
म्हणोनि करंटा करोनि ठेवी ॥ २ ॥
स्त्री द्यावी गुणवंती नसती गुंते आशा ।
यालागीं कर्कशा पाठीं लावी ॥ ३ ॥
तुका म्हणे मज प्रचित आली देखा ।
आणिक या लोकां काय सांगों ॥ ४ ॥

यांत परमेश्वरानें योगक्षेम चालविला नाहीं अशी बुद्धि आहे काय ? उलट ज्या प्रकारचा योगक्षेम योग्य तोच चालविला आहे असेंच म्हटलें आहे. आणि अन्नान्न करून मरण्याची जरी पाळी आली तरी असा अनन्यभक्त त्या प्रसंगींही देवानें उचित असाच योगक्षेम चालविला असें म्हणणार. अर्थात् श्रीकृष्णाच्या वचनास बाध येत नाहीं. साधारण जन मात्र अशा प्रसंगीं देवास शिवी देऊन म्हणणार कीं '...काय माझें केलें । धड या विठ्ठलें संसाराचें ॥' सारांश, देव अनन्यभक्तांचा योगक्षेम चालवितो कीं नाहीं याची साक्ष त्या भक्तांकडूनच घेतली पाहिजे, येरा गाबाळाकडून घेतां नये. आणखीं ही सुद्धां गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे कीं या प्रकारें ऐहिक योगक्षेमाचा भार जर परमेश्वरावर टाकला नाहीं तर पारमार्थिक कल्याणाचा मार्गच खुंटतो. तुकोबांनीं म्हटलें आहेः—

नव्हे आराणूक संवसारा हातीं । सर्वकाळ चित्तीं हाच धंदा ॥ १ ॥ देवधर्म सांदीं पडिला सकळ । विषयीं गोंधळ गाजतसे ॥ २ ॥ रात्री दिस न पुरे कुटुंबाचें समाधान । दुर्लभ दर्शन ईश्वराचें ॥३॥ तुका म्हणे आत्महत्या रे घातकी। थोर होते चुकी नारायणीं ॥ ४ ॥

याप्रमाणें अंतःकरणांतील सर्व स्थळ संसारानें व्यापून जातें; मग देवधर्मास अवकाश तो कसा मिळावा ? 'रोम रोम बिख भीनिग्रा अमृत कहां समाय!' आणि याप्रकारें हें विष सर्वतः प्रसृत झाल्यावर घात होण्यास विलंब तो किती !

एकंदरींत शास्त्रीय दृष्ट्या विचार केला काय अथवा आध्यात्मिक दृष्ट्या विचार केला काय, वर निर्दिष्ट केलेल्या स्थळीं योगक्षेम याचा अर्थ शंकराचार्यादिकांनीं ऐहिक कल्याणपर केला आहे तोच योग्य आहे.






अनुक्रमणिका

# शनवारवाड्याची आग.

१. पुण्याच्या शनवारवाड्यास आग लागून तो भस्मसात् झाला हें प्रसिद्धच आहे. परंतु ही आग कधीं लागली हा मुद्दा अझूनही वादग्रस्त आहे. बॅांबे गॅझेटिअर, व्हॅा.१८, भाग ३, पान ३४६ वर पुढील उल्लेख आहे:—

" In 1827, on Thursday, the bright sixth of Phalgun or March-April, the palace caught fire and continued burning about a fortnight. "

यांत इ. स. १८२७ च्या फाल्गुन शुद्ध ६ स, म्हणजे इंग्रजी मार्च-एप्रिल मासांत, ही आग लागली असें लिहिलें आहे.

२. पुण्याच्या भारत-इतिहास-संशोधक मंडळाच्या शके १८३४ च्या अहवालांत पृष्ठ ८१ वर खालील माहिती रा. गं. ना. मुजुमदार यांनीं एका हस्तलिखित पत्रावरून प्रसिद्ध केली आहे.

" शु. ७ गुरुवारीं थोरला वाडा शनवारचा येथें अग्नीचा उपद्रव होऊन........दरोबस्त काम जळालें. आठ दिवस झाले......दोन दिवस आगीचा उपद्रव होता. "

रा. मुजुमदार म्हणतात, " फाल्गुन शु॥ ७ गुरुवार हा योग मोडकांचे जंत्रीवरून शके १७४३ तच येतो......यावरून शनवारवाड्यास आग ता. २८ फेब्रुवारी सन १८२२ रोजीं लागून ता. २ मार्च पर्यंत होती."

३. इतिहाससंग्रह, वर्ष ६ च्या पहिल्या त्रिकुट अंकांत, पृष्ठ ५४ वर, जो मजकूर आहे त्यांत खालील वाक्यें आहेत:—

" शनिवारवाडा हा पेशवाई गेल्यानंतर लवकरच अग्निनारायणास अर्पण झाला. तो जळाल्याची मिति ' पुणें ग्याझेटिअर, ' मध्यें फाल्गुन शु. ६ तारीख ३ मार्च इ. स. १८२७ ही दिली आहे. परंतु ती चुकीची असून तारीख २८ फेब्रुवारी इ. स. १८२२ ही बरोबर आहे, असें अस्सल कागदपत्रांच्या आधारावरून सिद्ध होतें. हा वाडा पांच सहा दिवस जळत होता. "

इतिहाससंग्रहकारांनीं आधारासाठीं निराळा अस्सल पुरावा कांहींच दिलेला नाहीं, इतकेंच नव्हे, परंतु दिलेली माहितीही अव्यवस्थितपणें सांगितली आहे. कारण पुणें गॅझेटिअर म्हणजेच बॅांबे गॅझेटिअर व्हॅा. १८ भाग ३, होय; व हा तिसरा भाग पुण्यासंबंधीं असल्यानेंच त्यास 'पुणें गॅझेटिअर' म्हणतात. अर्थात् त्या पुणें-गॅझेटिअरमध्यें मूळांत तारीख दिलेली नाहीं. इतिहाससंग्रहकारानें सन १८२७ च्या फाल्गुन शु. ६ ला कोणती तारीख येते हें पाहून, तीच तारीख देऊन वार मात्र गाळला आहे; व हें सारें पुणें-गॅझेटिअरमध्यें दिलें आहे अशी गप्प झोंकून दिली आहे. असो. यानंतर सन १८२२ बद्दल जें विवेचन केलें आहे तेंही स्वतंत्रपणें केलेलें दिसत नाहीं. भारत-इतिहास-संशोधक मंडळाच्या, मागें सांगितलेल्या. अहवालाचाच तो अनुवाद असावा. तात्पर्य, इतिहाससंग्रहाची साक्ष या कामीं निरुपयोगीं आहे. म्हणून ( १ ) बॅांबे गॅझेटिअर, व (२) मुजुमदार, असे दोघेच साक्षीदार राहतात.

४. बॅांबे गॅझेटीअर आगीची नक्की तारीख अशी देतें:—

फाल्गुन शु. ६ **गुरुवार**, इंग्रजी **मार्च-एप्रील** मास, सन १८२७. दिवस सांगण्याची ही तऱ्हा चमत्कारिक तर खरीच. परंतु ती गॅझेटिअरनें स्वीकारिली आहे. मराठी मास व तिथि आणि इंग्रजी सन ही पद्धति हास्यास्पद होय. कारण यापेक्षां अधिक व्यवस्थित रीतीनें तारीख वार सांगतां येणें शक्य नव्हतें असें मुळींच नाहीं. असो. सन १८२७ म्हणजे शके १७४८ व शके १७४८ च्या फाल्गुन शु. ६ ला गुरुवार येत नसून शनिवार येतो. व सन १८२७ च्या फाल्गुनांत इंग्रजी मार्च-एप्रिल महिने येत नाहींत, फेब्रुवारी-मार्च महिने येतात. म्हणून गॅझेटिअरची मिति प्रमाण धरल्यास इंग्रजी महिने व वार चुकीचे ठरतात.

५. रा. मुजुमदारांजवळील पत्रांत फक्त ' शु॥ ७ गुरुवार " इतकच आहे. व यावरून त्यांनीं फाल्गुन शु॥ ७ गुरुवार हा योग सन १८२२ म्हणजे शके १७४३ तारीख २८ फेब्रुआरी या दिवशीं येतो असें सांगून, याच दिवशीं आग लागली असें सिद्ध केलें आहे. परंतु " शु॥ ७ गुरुवार " हा योग फाल्गुन मासांतीलच कां पत्करावा याला त्यांनीं कांहीं एक प्रमाण दिलेलें नाहीं. त्यांनीं जें पत्र आधाराला दिलें आहे, त्याचा लेखक




अनुक्रमणिका

सन १८२२ नंतर किती वर्षें हयात होता व तो केव्हां निधन पावला, हेंही त्यांनीं सांगितलें नाहीं. कारण 'फाल्गुन शु॥ ७ गुरुवार' हा योग सन १८२२ प्रमाणें सन १८२६ मध्येंही येतो. " पेशवाई गेल्यानंतर चारपांच वर्षांतच शनवारवाडा जळला असें वृद्ध लोक म्हणत असत.–" असें एक प्रमाण रा. मुजुमदारांनीं सांगून सन १८२२ सालींच वाडा जळला असावा असें दुसऱ्या रीतीनें सिद्ध केलें आहे. परंतु हें आप्त वाक्य प्रमाण समजावयाचें असल्यास "शु॥ ७ गुरुवार" हा योग सन १८२२ पूर्वीं व सन १८१८ नंतर केव्हां केव्हां येतो हें पाहून व सन १८२२ पूर्वीं मुळींच येत नाहीं असें सिद्ध करून मग हें साल ठाम ठरविणें योग्य होतें. तेंही रा. मुजुमदारांनीं केलें नाहीं. असो. त्यांनीं न केलें तरी तें आपण करूं या.

१ श्रावण शु॥ ७ गुरुवार शके १७४१ तारीख २९ जुलै सन १८१९
२ पौष शु॥ ७ गुरुवार शके १७४१ तारीख २३ दिसेंबर सन १८१९
३ भाद्रपद शु॥ ७ गुरुवार शके १७४२ तारीख १४ सप्टेंबर सन १८२०
४ ज्येष्ठ शु॥ ७ गुरुवार शके १७४३ तारीख ७ जून सन १८२१

याप्रमाणें सन १८२२ पूर्वीं "शुद्ध ७ गुरुवार" हे योग चार वेळां चार निरनिराळ्या महिन्यांत येतात, व यांपैकीं कोणतीही एक मिति ठरविणें अशक्य नाहीं. कारण फाल्गुन मासांतीलच "शु॥ ७" कां समजावी याला रा. मुजुमदारांनीं कांहीं एक कारण दिलेलें नाहीं, हें वर सांगितलेंच आहे. सारांश, मंडळानें हातीं घेऊन अव्यवस्थितपणें निकालास लाविल्यामुळें हा प्रश्न कायमचाच अनुत्तर राहिला आहे. गॅझेटिअर व मुजुमदार यांचे मुद्दे पुनः एकदां स्पष्टपणें देतों.

**गॅझेटिअर.**

१ मित्ति फाल्गुन शु॥ ६ गुरुवार शके १७४८
२ मार्च–एप्रिल सन १८२७
३ आग पंधरा दिवस होती.

**रा. मुजुमदार.**

१ मित्ति फाल्गुन शु॥ ७ गुरुवार शके १७४३
२ फेब्रुवारी तारीख २८ सन १८२२
३ आग दोन दिवस होती.

वरील मुद्द्यांत फाल्गुन मास व गुरुवार याशिवाय इतर कोणत्याही बाबतींत या उभयतांची एकवाक्यता नाहीं, हें स्पष्ट आहे. परंतु फाल्गुन मास हा मुजुमदारांनीं गॅझेटिअरमधून घेतलेला दिसतो.

६. तारीख ३ जून सन १८१८ शके १७४० वैशाख व. ३० च्या मुहूर्तावर बुधवार रोजीं बाजीरावानें पेशवाईवर पाणी सोडिलें. त्यानंतर सन १८२७ पर्यंत आलेला फाल्गुन मास मोडकांच्या जंत्रीवरून वाचकांच्या सोयीसाठीं खालीं देतों.

| अनु. नं. | सन | फाल्गुन शु. ६–७ रोजीं येणारे इंग्रजी महिने व त्याखालीं मितीच्या तारखा. | | फाल्गुन शु. ६–७ रोजीं येणारे वार. | | शके. |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | | ४ | | ५ |
| | | | | शु. ६ | शु. ७ | |
| १ | १८१९ | फेब्रुवारी ता. २–३ | मार्च. | मंगळ. | बुध. | १७४० |
| २ | १८२० | ,, ,, १९–२० | ,, | शनि. | रवि. | १७४१ |
| ३ | १८२१ | मार्च ,, ९–१० | एप्रिल. | शुक्र. | शनि. | १७४२ |
| ४ | १८२२ | फेब्रुवारी ,, २७–२८ | मार्च. | बुध. | गुरु. | १७४३ |
| ५ | १८२३ | ,, ,, १६–१७ | मार्च. | क्षय. | सोम. | १७४४ |
| ६ | १८२४ | मार्च | ता. ६–७ | क्षय. | रवि. | १७४५ |
| ७ | १८२५ | फेब्रुवारी ,, २४–२५ | मार्च. | गुरु. | शुक्र. | १७४६ |
| ८ | १८२६ | मार्च ,, १५–१६ | एप्रिल. | बुध. | गुरु. | १७४७ |
| ९ | १८२७ | फेब्रुवारी | मार्च ता. ३–४–५ | शनि रवि. | सोम. | १७४८ |
| १० | १८२८ | फेब्रुवारी ,, २१ | मार्च. | गुरुवार. | शुक्रवार. | १७४९ |



वरील तक्त्यावरून एक गोष्ट सिद्ध होते कीं, '**फाल्गुन शु. ६ गुरुवार, मार्च-एप्रिल**' हा योग सन १८१९ पासून सन १८२८ पावेतों मुळींच केव्हांही येत नाहीं. अर्थात् गॅझेटिअरकारांचा हा योग काल्पनिक अतएव त्याज्य होय. **फाल्गुन शु. ६ गुरुवार फेब्रुवारी-मार्च** हा योग मात्र सन १८२५ व १८२८ मध्यें येतो. म्हणजे तारीख २४ फेब्रुवारी सन १८२५, अगर तारीख २१ फेब्रुवारी सन १८२८ गुरुवारीं शनवारवाड्यास आग लागली, असें सिद्ध होऊं पाहतें.

७. परंतु, आणखीही एका दृष्टीनें या प्रश्नाचा विचार केला पाहिजे. रा. मुजुदारांचें अस्सल पत्र असावें तितकें विश्वसनीय नाहीं, हें मागें दर्शविलेंच आहे. शिवाय, तें पत्र आग लागल्यावर आठ दिवसांनीं लिहिलेलें आहे असें त्याच पत्रांत आहे. म्हणून आठ दिवसांनीं तिथि किंवा वार यांची चुकी होणें शक्य आहे. मुजुमदारांचा पत्रलेखक तिथि, वार लिहिण्यांत चौकस होता, गावाळ नव्हता, हें त्याच लेखकाच्या इतर पत्रांवरून ठरविणें शक्य आहे. परंतु असा त्याचा दुसरा पत्रव्यवहारही पुराव्यासाठीं पुढें आलेला नाहीं. या एकंदर गोष्टींचा विचार करतां रा. मुजुमदारांचें पत्र पुरावा या दृष्टीनें कवडीमोल ठरतें; व मराठी महिन्याच्या बाबतींत त्यांनीं गॅझेटिअरचाच आश्रय केला आहे, म्हणून गॅझेटिअरचा पुरावा किती उपयोगी पडतो तें पाहून शनवारवाड्याची आग कधीं लागली हें ठरविण्याचा प्रयत्न करूं.

८. शकांच्या वर्षांमध्यें ७८ वर्षें मिळविलीं म्हणजे सन येतो हें स्थूल गणित झालें. परंतु कित्येक वेळां सालअखेरचे मास असल्यास, म्हणजे माघ-फाल्गुन सारखे महिने असल्यास, ७९ वर्षें शकांत मिळवावीं लागतात. गॅझेटिअरकारांचे लक्ष्यांत हा सूक्ष्म भेद आला नसेल, व त्यांनीं शके १७४९ मध्यें ७८ वर्षें मिळवून सन १८२७ हा आंकडा दिलेला दिसतो. वस्तुतः या वेळीं फाल्गुन मास असल्यानें ७९ वर्षें मिळविणें अवश्य आहे; व ७९ वर्षें मिळविलीं म्हणजे सन १८२८ हें साल येतें. व शनवारवाड्याचीं आग फाल्गुन शु॥ ६ गुरुवार तारीख २१ फेब्रुवारी सन १८२८ या दिवशीं लागली असें नक्की ठरतें.

९ रा. मुजुमदारांनीं शके १८३४ च्या अहवालांत अस्सल पत्र प्रसिद्ध करून शेवटीं असें लिहिलें आहे कीं, "पेशवाई गेल्यानंतर चार पांच वर्षांनींच वाडा जळला असें वृद्ध लोक सांगतात. व म्हणून सन १८२२ मध्येंच वाडा जळला असावा." हें आप्तवाक्य प्रमाण मानावयाचें असल्यास सन १८१९-२०-१८२१ या तीनपैकीं कोणत्या तरी एका वर्षीं वाडा जळला असावा असें सिद्ध होऊं पाहील. परंतु इतिहासाच्या बाबतींत वृद्धांचें सांगणेंही पुष्कळ वेळां निराधार ठरतें. शिवाय गॅझेटिअरकारांची अशी इतकी विलक्षण चुकी झाली असेल असें मानण्याचें कांहीं प्रयोजन दिसत नाहीं. म्हणजे गॅझेटिअरकारांचें म्हणणेंच प्रमाण समजून सन फक्त १८२८ असावा असें निश्चितपणें अनुमान होतें.*

३० जुलई १९२०

**वि. स. वाकसकर.**



* ही चर्चा प्रसिद्ध इतिहासलेखक रा. सरदेसाई यांजपाशीं मीं केली होती. तीवरून त्यांनीं रा. मुजुमदार यांस पत्र पाठवून खुलासा विचारिला. तेव्हां त्यांनींही मी दर्शविलेलीच तारीख खरी असून त्यांनीं प्रसिद्ध केलेल्या अस्सल पत्रावरील मिति चुकीची असल्याचें कबूल केलें आहे, ही फार समाधानाची गोष्ट आहे. हा लेख लिहून आल्यावर पत्र हातीं आल्यानें टीपेंत त्याचा उल्लेख केला आहे. वि. स. वा.





अनुक्रमणिका

# टिळक–निधन.

[ रा. रा. गोविंद पांडुरंग देवधर, एम्. ए., एल् एल्. बी. ]

१

झालें काय, कसें अकल्पित अहा ! हें आज हो ना कळे !
वृत्ति स्तंभित होउनी सकलही संवेदना मावळे !
वज्राघात अति प्रचंड शिरिं कीं सृष्टीचिया होउन
आली शेवटली तिला बधिरता ही वाटते दारुण ! १
विश्वाच्या कमला पदीं चुरडुनी कल्पांत हा मांडिला
काळानें गमतें अजी बघुनियां निद्रिस्त देवा तुला !
घेरी येउनि भाग्यसूर्य अमुचा हा कोसळे खालतीं !
व्हायाची उरली भयाण घटना याहून ती कोणती ? २

२

कोणी कांहिं म्हणा; म्हणा मरण हें सर्वांसची लागलें;
गेलें तें विसरा; धरा हृदयिं जें मागें अतां राहिलें.
येणें ना फिरुनी कधीं हरपलें जें भूतकालोदरीं,
केला दीर्घ विमुक्त कंठ कितिही तो शोक तुम्हीं जरी. ३
घेई क्रूर कृतांत हा निशिदिनीं कोणी न कोणी बळी;
जें सामान्य असे, तदर्थ पडणें कां व्यर्थ दुःखानळीं ?
यानें सांत्वन होत नाहिं अमुचें; जी हानि झाली असे
ती आहे बिनमोल; जोड तिजला भूपृष्ठिं कोठें नसे ! ४

३

शोकव्याकुल होउनी ढसढसां तारांगणें स्फुंदलीं;
चंद्राला कवटाळुनी दढहृदीं ती यामिनी स्फुंदली;
व्योम स्फुंदतसे अजूनिहि पहा, वारेहि हे स्फुंदती;
स्फुंदे हा रवि झांकुनी निजमुखा कृष्णांबरानें किती ! ५
स्फुंदे सागरही वियुक्त हृदयें; दिक्प्रांत आक्रंदती;
स्फुंदे विश्व; चराचर द्रवुनियां ढाळीत अश्रूंप्रती;
आर्यावर्त रडे, विदारित महाराष्ट्र रडें नावरे,
मुंबा क्रंदतसे अहा ! ढळढळां संमूढ दग्धांतरें ! ६
जेथें ढाळित आसवें विलपुनी अध्यात्मविद्या स्वतां,
व्हावें विस्मित कासया रडतसूं आम्ही जरी हे अतां !
पुण्यात्मा रुसुनी अम्हांवरि अहा ! गेला कसा आज तो ?
झालें विश्व रितें; स्मशानसरिसा संसार हा भासतो ! ७





अनुक्रमणिका

४

जीवालागिं पुनः पुनः जनन तें घेणें असे नेमिलें;
होते उन्नति उत्तरोत्तर अशी त्याची, मला हें कळे.
होते शांति परी न अल्प बधुनी दूरस्थ ज्याजाकडे;
राहे जाणिव हीच-मुद्दल अजी गेलें खरें रोकडें ! ८

आहे या हृदिं पेटला धडकुनी जो शोक-वैश्वानर,
जाणें मी, कवितेंत त्याप्रति असे सामावणें दुष्कर.
कां कीं शब्दिं नसे यथोचित तया सामर्थ्य वर्णावया,
सृष्टी शक्त नसे जशी प्रभुवरा संपूर्ण दावावया ! ९

शब्दांचा उपयोग दग्ध मनुजां तो एक आहे परी;
त्यांहीं दुःसह शोकभार हलका होतो जरा अंतरीं.
शब्दीं वास्तव मी स्वतांप्रति झणीं वेष्टूनि ठेवीतसें;
दुःखाची परि त्या अनंत कविता ही रूपरेखा असेः–१०

५

होतों बोलत वैसलों, पडति तों हे शब्द कर्णांवर––
' गेले सोडुनि लोकमान्य **टिळक श्रीबाळ गंगाधर** ! '
विद्युत्पातच जाहला समयिं त्या, भासे असें अंतरीं;
होई बोध न; पाहिलें टकमकां––हें काय झालें तरी ! ११

झाली केवढि हिंदभूमि ! तव ही हानी जयीं आठवे
होई व्याकुळ चित्त, गाळिति जवें नेत्रें किती आंसवें !
रत्नें आजवरी अनेक हरिलीं काळें तुझीं उज्ज्वल,
आतां कौस्तुभ दिव्य हा तव बये ! चोरी दुरात्मा खल ! १२

होता तो नरकेसरी, जगिं नस तत्**केसरी**ला सरी;
होते कांपत गर्जना परिसुनी त्या सर्व जैसे करी.
वाणी धीर, गभीर, तीक्ष्ण, सरल, प्रोद्दीपक, प्रेमळ
झाली शांत अतां, तदीय उरली मागें स्मृती केवळ ! १३

होतों विश्वसुनीच यष्टिवर त्या सारे अम्ही आंधळे;
केव्हांही न उपेक्षिलें लव जरी आलीं महा वादळें.
हा हा ! श्रीहरि ! आज ती हरपतां व्हावें कसें आमुचें !
काळोखांत न कांहिंही गवसतें; भांबावलों, ना सुचे ! १४




अनुक्रमणिका

६

होतें तूझें अचल सखया ! धैर्य मेरूप्रमाणें;
आपत्काळीं तिळहि ढळणें भीतिनें तें न जाणे;
पाहे डोईवरति तळपे तीक्ष्ण तो खड्ग काळ,
निद्रा घेई अभय तरिही धन्य तो आर्यबाळ !१५
होतें शील ज्वलनसरिसें शुद्ध देदीप्यमान;
पाहोनी ज्या दुरित अवघें खालती घाली मान;
शत्रूही ज्या बघुनि भुलल, डोलले आदरानें;
गेलें वाटे मज उजळण्या स्वर्ग तें स्वद्युतीनें !१६
सर्वांगीण, प्रखर, जलधीतुल्य बुद्धी अगाध,
लावी नाना गहन गणितीं ज्योतिषीं नव्य शोध;
आर्यांची प्राग्वसति ठरवी उत्तरस्थ ध्रुवांत
सिद्धांतानें निज चतुर जो धन्य तो बुद्धिमंत!१७
गीतेला जो वळण नव दे, कर्ममार्गाकडे ने,
'बाळाचार्य' प्रथित जगतीं जाहला जो तयानें;
वाचोनीयां मुदित हृदिं तद्दिव्य " गीतारहस्य "
विद्वद्रत्नीं सकल नमिला ग्रंथ तो सुप्रशस्य. १८

७

पूजीयेलें तुजसि गणुनी रामदासावतार;
केला तूंची बहुविध जनीं राजनीतिप्रसार;
लावीयेली प्रखर विमल ज्योत देशांधकारीं,
राष्टैक्याची रुजविलि तुवां भावना चित्तहारी.१९
'आहे जन्मोद्भव मम खरा तो स्वराज्याधिकार-'
या तत्त्वाची प्रथमच जनीं केलि धैर्यें पुकार.
सत्तावाद्यां अवगणुनियां, प्रेरुनी देशभक्ति,
तूं आर्यांचीं हृदयकमळें एक केलीं स्वहस्तीं !२०
प्रेमानें आमरण अपुल्या जीविता वाहियेलें;
देशासाठीं प्रबळ रिपुंशीं झुंजही थोर केलें;
स्वातंत्र्याचा ध्वज निशिदिनीं ठेविला नाचवीत;
देशप्रीति स्फुरविली जनीं रोमरोमीं नितांत !२१
उत्साहानें विगालत महाराष्ट्रभू नांगरोना,
तेजस्वी बीं निरुपम तयीं पेरुनी थोर यत्नीं,
स्वापत्तीचें नव खत सुखें घालुनी आदरोनी,
रेणूरेणूंतूनि उगविले वीर देशाभिमानी ! २२
चातुर्यानें करुन सकलां एकठायीं निविष्ट,
देशोद्धारीं अनिमिष तयां गोविलें धूष्टचित्त;
सत्तायुद्धीं नव शिकविले खेळण्या डावपेंच;
स्वार्थारीचा हळु हळु तयें रोधिला स्वैर नाच!२३
स्वार्थत्याग, प्रखर शुचिता, दक्षता जागरूक,
आर्यावर्तीं चतुर, निधडा राजनीतिज्ञ एक;
देशप्रीती, कळकळ, जिवापाड कष्ट प्रयास,
या सर्वांहीं शिवनृपतिची आठवे मूर्ति खास.२४
तानाजीची प्रलयपवनाहून मोठी धडाडी,
बाजीचीही अभयहृदयें शत्रुसैन्यीं मुसंडी,
दासाची ती शिकवण नवौजस्विनी, सत्त्वशाली
गेली!गेली!चमकुनि पुन्हां एकदां हाय गेली!२५

८

हिन्दिस्तानीं लखलखलि जी ज्योत दिव्य प्रचंड;
सत्तोन्मत्तां दिवसनिशिं जो भासला काळदंड;
मध्यान्हार्कासम तळपला विश्वि बुद्धिप्रकर्षें;
होता जोही विविध समरक्षेत्रिं चाळीस वर्षें; २६
दावीयेली अमुचि पहिली संस्कृती पाजळून;
केला जागा हृदयिं हृदयीं आत्मविश्वास पूर्ण;
देशोद्धारास्तव घडवुनी साहसी राष्ट्रवीर
स्वातंत्र्याचे सरस दिधले पाठ त्यांतें अपार;२७
यत्केंद्राच्याभंवति पडला घोळ नाना मतांचा,
जो तो बोले "कळत न तुम्हां,मीच विद्वान् जगींचा!"
सातत्यासी कुणिहि न बघे, वर्तमानींच लुब्ध;
अस्ताव्यस्त भ्रमति सगळे स्वाभिमानप्रमुग्ध;२८
नाहीं ज्याची अणुहि चळली केधवां सूक्ष्म दृष्टि;
झाली शक्ता लवहि न जया मोहण्या स्वप्नसृष्टि;
तत्त्वा सोडी कधिं न चुकुनी लेश जो सत्त्वधीर;
या राष्ट्राचा झटुनि निरवी सर्व संसारभार. २९
दुःस्वार्थाचा भयद पट तो सारुनी दूर हस्तीं,
स्वातंत्र्याची नयनसुखदा दावुनी रम्य मूर्ति
आर्यां झाला हरहर ! तिरोभूत तो कर्मयोगी !
द्यावी कोणी व्यथितहृदया शांति या कर्ममार्गीं३०
स्वातंत्र्याच पठन करण्या आर्यभू पाठशाळा
इच्छाशक्ती घडवित तुझी भीष्मशा आर्यबाळा !
नाहीं तूझी दिसत रचनाचातुरी ज्यां तरी ही,
गर्वांधां त्यां दिसत न तुझें आपल्यात काहीं!३१



देशासाठीं समर करुनी वीर झुंजार मोठा,
धैर्योत्कर्षे निज ' मरहटा ' गाजला तो मराठा.
आशावादी सतत, ढळली देशनिष्ठा न लेश;
कैसा आतां अहह!करितो अग्निकाष्टप्रवेश ! ३२
कारागारीं फिरुनि फिरुनी राहुनी हाय ! हाय !
झाला होता विगलित अती वीर तो वज्रकाय;
तच्चडात्मा विहरुं न शके स्वैर त्यां जीर्ण गेहीं,
गेला स्वर्गा म्हणुनि गमतें व्हावया दिव्य-देही ३३
ऐके येथें कुणि न, म्हणुनी आमुचें घेउनीच
गाऱ्हाणें बा! प्रभुजवळ तूं सेर्ष गेलास साच !
सर्वस्वाचा निज करुनि बा होम येथें सुखानें
केलें दिव्य प्रखरतम तूं स्वीय पूर्णाहुतीनें ! ३४
होतासी बा ! भरततिलका!प्राण या आर्यभूचा;
जाणें केवीं तुजसि रुचलें बोध ना होय याचा.
त्वन्माता ही कशि हळहळे बा तुला आठवोनी!
येईं,पाहीं,रड-रड-रडे कैशि ती दीनवाणी!:-३५

९

"हा ओढवे अजि कसा विधि दुर्विलास !
नाहीं तयास उपमा जगतांत खास !
गेला कुठें अहह ! बाळ मदीय गेला !
व्हावें कसें मम तयाविण हा कपाळा ! ३६
" होतें विसंबुनि तयावर आजवेरी;
होते अनेक मजला जरि हाय ! वैरी !
आधार एक मम तो हृदया विसावा,
हा हा! प्रभो! फिरुनि केविं अतां दिसावा!३७
"धिक् धिक् जगा!अजि कुठें तव पुण्य गेलें!
काळें कसें प्रिय तुझ्या टिळकास नेलें !
रत्नाकरा ! रड अतां, रडतेंच मीही !
या रोदनाविण अतां उरलें न कांहीं ! ३८
" अव्हेरिलास जनना प्रिय जन्मभूम !
अव्हेरिलास जनता नतपादपद्मां !
अव्हेरलास सखया ! निज राष्ट्रधर्म !
अव्हेरिलेंस अबलावनयुद्धकर्म ! ३९
" रागेजलास अमुच्यावर तूं असा कां ?
प्रेमावि[illegible] मुचाचया तुज काय शंका
ये धांवुनी झडकरी प्रिय बाळराया !
आहों समुत्सुक पुन्हां तुजला पहाया ! ४०
" स्वातंत्र्यपुष्प रमणीय कसें फुलावें !
आनंदहास्य कमनीय कसें खुलावें !
आशालता बहरल्या अमुतें दिसाव्या !
या गोष्टि सर्व तुजवीण कशा घडाव्या !४१
" होतास बा ! अनभिषिक्त नृपाळ साचा
आधार दीन दुबळ्या चुकल्या जनांचा !
झालास एकच इथें प्रिय **लोकमान्य**;
सारांश, तूंच तुजसा, उपमा न अन्य. ४२
" कोणी विचारि जरि—या शतकांत होता
स्वातंत्र्य-पुण्यहवनीं जगिं कोण होता ?
झाले जगांत असती जरि अन्य साच,
होई स्मृति प्रथम बा ! मजला तुझीच. ४३
" आहेत थोर दरडी सलिलीं निमग्न;
आवर्त भीषण तसे भ्रमती मधून;
व्हावें कसें अजि नुरे जर कर्णधार ?
मर्मांस तोडिति जवें कटु हे विखार ! ४४

१०

" फांकेल रम्य सुषमा नव शारदीय;
सृष्टी नटेल वसनीं किति लोभनीय;
पुष्पें सुगंध भवतीं उधळून मत्त
हर्षें स्वकीय करितील जगास रक्त. ४५
" आनंद-मित्र सुमनोहर तो वसंत
येईल हांसत, जगासहि हांसवीत;
होईल सर्व; परि हाय ! नसे उसंत
बाळा घडीहि तुझिया विरहा अनंत !४६
" दुःखा ! सदैव सहवास तुझा नृशंस
काळासही करिल बा ! भयभीत खास !
मृत्युस्मृता ! असिसि मोहक तेविं तीक्ष्ण;
होत क्रमें हृदय वत्सल तेविं चूर्ण ! ४७
" नक्षत्रपुंज हळुच स्फुरती वचा याः—
' जाळें नभीं विणितसे नित ईशमाया;
घालूनि जन्ममृतिचीं तयिं भिन्न सूत्रें
निर्मीतसे जगतिं ता नव चारु चित्रें. '४८



"दावीति हेंच उदयास्त दिवाकराचें;
दावीत हेंच परिवर्तन षड्ऋतूंचें;
निःश्वास एक परि येउनि कंपितार्त
शून्यांतुनी हृदयदंश हळूच घेत ! ४९
"कैसें तरी मन तुझा विसरो वियोग,
निद्रा करीं म्हणुनि त्या निरवीं सवेग;
चित्तास बोंचति परी अनिवार कांटे,
तो अश्रुपूर थिजुनी हृदयांत दाटे ! ५०
"काळा ! कसा अचुक साधियलास दावा !
भोंवे भयप्रद तुझा जगतास कावा !
चोरून हा दरवडा अह ! घातलास
झाला अहा ! मम अजी तरि सर्व नाश ! ५१
"गोपाळ मत्सुत तदा गिळिला तसा तूं !
हा बाळ आज हरितां मनिं ये न किंतु !
आहे असें तव मनीं तरि काय सांग !
काळा ! नसेच तव कां कुकृतीस थांग ! ५२
"हें आठवे जयिं मना चरकाच बैसे !
होतें जिणें असहनीय नको नकोसें !
त्वत्प्रेम बाळ टिळका ! मनिं आठवून
गाळीत अश्रु बसतें विरहार्त खिन्न ! " ५३

११

प्रेमें आठवुनी अनेक गुण ती आक्रोश ऐसा करी;
द्यावा धीर तिला कुणी ? बुडतसे मोहें विपत्सागरीं !
मूर्च्छा येत पुनः पुनः उफळुनी क्लेशातिरेकें तिला !
दैवा ! काय असा भयानक अहा त्वां खेळ हा मांडिला ! ५४
सूर्यास्तींच जयीं प्रभंजन जवें वाहावया लागले,
पक्ष्यांचे समुदाय दूर भिरिरी व्योमीं जयीं फेंकिले,
शाखा कोसळल्या, कडाकड रवें तीं काननें भंगलीं,
पानें शेवटलीं जयीं उधळुनी चोंहीकडे फांकलीं; ५५
लाटा आदळल्या धडाधड तटीं प्रक्षुब्ध जैं होउनी,
मुंबेला झणिं कृष्णमेघनिकरीं जैं टाकिलें वेढुनी,
शंका अंधुक घातकी जनमनीं तेव्हांच हेलावली:
सामग्री इतुकी कुणास्तव तरी काळें असे योजिली ! ५६

१२

झाली ज्योत विलुप्त कालवदनीं या काडवाती अतां
मागें राहुनि जाळिती निजतनू प्रक्षुब्ध सत्यव्रता !
मावेना नभिं अंधकार म्हणुनी जेथें तिथें कोसळे !
वाटे, जाउनि तोल सृष्टि अवघी शून्यांतरीं ढासळे ! ५७
गेली लोचनिंची द्युती ! हृदयही हा हा ! उडालें कुठें !
केलें भारतिला प्रकाशित जिनें ती जादु गेली कुठें !
हे जीवंत अम्ही असोनि मृतसे झालों जिच्यावीण, ती
हाहा ! केविं दुरावली प्रिय सुधावल्ली प्रभो ! संप्रती ! ५८
ही ऐशी घटना नृशंस पुढतीं होणार कांहीं तरी,
याची जाहलि वाटतें कुणकुणा जाणीव ती अंतरीं




अनुक्रमणिका

गेले सोडुनियां जगास म्हणुनी वेगें नरश्रेष्ठ ते !
ओसाडींत करावयास वसती तें कोण हो इच्छितें ? ५९

१३

सामोरे तुजलागिं बाळ टिळका ! आले नभःप्रांगणीं
जीवात्मे बघ हृष्टचित्त सगळे माळा करीं घेउनी:
'गोविंदाग्रज' घेउनी स्वमुरली दिव्य स्वरें गातसे,
प्रेमें हृत्कुसुमें कवींद्र 'टिळक' त्वत्पादिं अर्पीतसे ! ६०
हर्षें आळवितो "विनायक" नभीं घेऊनियां मंडलें;
गातां त्वद्गुण "माधवानुज" अहा ! ब्रह्मांड हर्षें झुले;
दिव्याचे नव झोत 'बालकवि' तो भोंतीं मुदें फेंकितो;
तेजस्वी स्वतुतारि 'केशवसुत' त्वत्स्वागता फुंकितो ! ६१
हर्षें वाहति 'मोगरे' तव शिरीं तीं मोगऱ्याचीं फुलें;
'आगाशे' हरिखूनि अर्पिति पदीं बाष्पांजली आपुले;
सारे हे अभिवादनार्थ जमले बाळा ! तुझे सौंगडे—
गोपाळ-द्वय, विष्णुशास्त्रि, हरिही, विद्वन्मणी रानडे ! ६२
ऐसें स्वागत बा ! सहर्ष करिती स्वर्गीं महात्मे तव,
ज्यातें पाहुनि अंतरीं जळफळे सासूय तो वासव.
कैसा हा विधि दुर्विलास नकळे जें त्यास सौख्यावह,
अंगारासम होय तेंच अमुतें हा हन्त ! दुःखावह ! ६३

# पुस्तक-परिचय.

## १. मुलांचा महाराष्ट्र.

रा. रा. गोविंद अनंत मोडक यांनीं 'मुलांचा महाराष्ट्र' या पुस्तकाची द्वितीयावृत्ति थोडथा दिवसांपूर्वीं प्रसिद्ध केली. चार वर्षांत प्रथमावृत्ति संपून द्वितीय आवृत्तीचा योग आला यावरूनच पुस्तकाची लोकप्रियता व्यक्त होत आहे. ह्या पुस्तकावर वि. ज्ञा. विस्ताराच्या सन १९१६ जूनच्या अंकांत मार्मिक व विस्तृत अभिप्राय अधिकारी इतिहासज्ञाकडून आलेला असल्यामुळें, तशा प्रकारची तपशीलवार पुस्तकाची तपासणी पुनरपि करण्याचें प्रयोजन नाहीं. त्या अभिप्रायांत सांगितलेल्या बहुतेक सर्व सूचनांचा अंतर्भाव ग्रंथकारांनीं ह्या नवीन आवृत्तींत केला असून, महाराष्ट्रेतिहासाची एकंदर संगति विशेष काळजीनें जुळविली आहे. भाषेच्या संबंधानें तर आतां ही कृति बहुधा निर्दोष आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं. विद्यार्थ्यांस, सामान्य वाचकांस व अभ्यासेच्छूंस मराठी भाषेंत आटोपशीर व सर्व विषय पूर्णपणें मांडणारें असें हें पहिलें व एकच पुस्तक उपलब्ध आहे. त्याच्या नांवावरून तें लहान मुलांकरितांच आहे, असा भास होतो. परंतु, हें प्रौढ विद्यार्थ्यांच्याच आटोक्यांतलें असून, त्यांतील अनेक भाग लहानांस समजण्याजोगे नाहींत, असें विस्तारांतील पूर्वींच्या अभिप्रायाप्रमाणेंच आमचेंही मत आहे. 'मुलांचा महाराष्ट्र' हें नांव थोडेंसें भ्रामक आहे, ह्यांत संशय नाहीं. तथापि, नांवांतच म्हणजे विशेष जादू आहे, असेंही नाहीं. आजच्या स्थितींत हें पुस्तक उपयुक्त असून त्याची



विशेष जरूर आहे. तेव्हां, अशा उपयुक्त विषयादर ...केल्याबद्दल ग्रंथकाराचें अभिनंदन करून, प्रस्तुत पुस्तक वाचल्यावर मनांत आलेले एक दोन मुद्दे ह्या विषयांत काम करणारांच्या विचारासाठीं नमूद करितों.

Source Method म्हणजे साधनपद्धतीचा अवलंब ह्या पुस्तकांत केला असल्याचें रा. मोडक सांगतात. परंतु, अशा साधनांचा उपयोग केलेला पुस्तकांत फारच थोडा आढळून येतो. आम्हांस असें वाटलें होतें कीं, पुस्तकांतील विषय बहुतेक तत्कालीन लेखांच्या उताऱ्यांतच दिलेला असेल. परंतु, तसा प्रकार फारसा दिसत नाहीं. ग्रंथकारानें स्वतःचें वर्णन अगर विवेचन देण्यापेक्षां, शक्य तितके त्या वेळच्या लेखांचे उतारेच दिले असते तर विद्यार्थ्यांच्या मनावर त्यांचा चांगलाच परिणाम झाला असता. शिवाय या पद्धतींत प्रसिद्ध पुरुषांचीं चित्रें, वंशावळी, हस्ताक्षरें, नाणीं, वगैरे देऊन त्यांच्या साह्यानें प्रतिपाद्य विषय मुलांस सुलभ करावयाचा असतो. परंतु, अशा गोष्टी पुस्तकांत देणें म्हणजे पुस्तकाची किंमत मुलांच्या ऐपतीच्या बाहेर जाते, हें आम्हांस ठाऊक आहे; व त्या न दिल्याबद्दल आम्ही दोषही देत नाहीं. मात्र साधनपद्धतीचा अवलंब व्हावा तसा झालेला नाहीं एवढेंच सांगावयाचें आहे. मधून मधून विशिष्ट आख्यायिका देऊन कित्येक घराणीं व व्यक्ति ह्यांजबद्दल विद्यार्थ्यांचे मनांत आदर उत्पन्न करण्याची सोय असते; परंतु असें करितांना पुस्तकाचा आकार वाढतो व मुख्य विषय थोडक्यांत आटपत नाहीं. अशी अडचण ग्रंथकर्त्यास आली असावी.

महाराष्ट्राचा इतिहास हल्लीं बनावाच्या स्थितींत आहे. दर एक राजकीय घडामोड म्हणजे स्वारी, लढाई, तह, ठराव वगैरे कार्यकारणभावानें कसे उपस्थित झाले, हे बनाव बनतांना राज्यकर्त्यांच्या हातून चांगल्या किंवा वाईट गोष्टी कोणत्या झाल्या, हें व्यवस्थित रीतीनें जुळवून सांगण्याइतकी मजल आपल्या इतिहासाची अद्याप आलेली नाहीं. अर्थात्, अशा प्रकारच्या अनेक उणीवा या पुस्तकांत राहिल्या असून त्याजबद्दल ग्रंथकर्त्यास जबाबदार धरतां येत नाहीं. याचीं थोडीं उदाहरणें दिल्यास, आमचें म्हणणें स्पष्ट होईल.

१. 'दाभाडयांनीं नेमलेली कारभारी दमाजी गायकवाड धन्यास गुंडाळून ठेवून गुजराथचा कारभार स्वतंत्रपणें पाहूं लागला.' [ पृ. १७३ ]

२. 'मराठयांनीं सिद्दीस आपला मांडलिक केलें, व जंजिरा बाजीरावाचे हातीं आला' [ १७९, १८० ]

३. 'मूळच उपटलें कीं फांद्या आपोआप खालीं येतील.' [ १५६ ]

४. 'राघोबाच्या भोळेपणामुळें पेशव्यास कर्ज झालें, आणि पावसाळा निकट आल्यामुळें राघोबास पुण्यास येणें भाग पडलें.' [ २४७ ]

५. 'या सुमारास (१७६०) बाळाजी व सदाशिवराव यांच्या मनांत प्रचंड कल्पना घोळूं लागल्या. सर्व हिंदुस्थानभर एक दोन वर्षांत मराठी साम्राज्य पसरविण्याचा त्यांनीं बेत केला' [ २४८ ]

या सर्व विधानांत व अशा प्रकारच्या आणखींही कित्येक विवेचनांत प्रचलित भ्रामक कल्पनांचा अंतर्भाव झाला आहे. लेखकाच्या मनांत प्रतिपाद्य विषयाचा भरपूर व स्पष्ट खुलासा कार्यकारणभावाच्या पद्धतीनें ठसलेला नसला म्हणजे मोठमोठीं विधानें ठोकून देऊन विषयाची पूर्तता करण्याची इच्छा होते. ह्याच भ्रामक कल्पनांनीं ग्रँट डफचा ग्रंथ पुष्कळ ठिकाणीं टाकाऊ झाला आहे. ( १ ) दमाजीनें दाभाडयांस गुंडाळून ठेविलें, हा प्रकार खरा मानतां येणार नाहीं. उलटपक्षीं दमाजीनें गुजराथ सांभाळली नसती तर तेथील मराठयांचा अंमल साफ बुडाला असता. हे प्रकार सांगतांना, दाभाडे-गायकवाडांचे संबंध, गुजराथची परिस्थिति, तेथें दहावीस वर्षें चाललेल्या घडामोडी, व मराठशाहीचीं धोरणें तडीस नेण्याची पेशव्यांची व छत्रपतीची जबाबदारी, इत्यादि अनेक बाबतींचा विचार करावा लागतो. राज्य हें करणाराचें आहे, भोगणाराचें नव्हे, हें तत्त्व सामान्यतः केव्हांही अनुभवास येतें. ( २ ) सिद्दींना जिंकण्याचा मराठयांचा प्रयत्न शिवाजीच्या वेळेपासून चालू होता; परंतु तो कधींच सिद्धीस गेला नाहीं. बाजीरावानें प्रयत्न करण्यांत कसूर केली नाहीं, परंतु



त्यास यश आलें नाहीं. (३) दिल्लीवर आघात केला कीं निजाम जाग्यावर बसेल, ही कल्पना गोड दिसते; पण प्रतिनिधि व पेशवा यांजमधील वादाचा हा प्रकार केवळ काल्पनिक आहे. त्यास आधार नाहीं. वास्तविक अशा अनेक बाबतींत नाटकें व कादंबऱ्या यांचाच प्रभाव आपल्या मनावर विशेष असल्यामुळें ऐतिहासिक सत्य लोपून जातें. दिल्लीचे बादशाहास सांवरून धरण्याचंच शाहूचें नेहमीं धोरण होतें; बंडखोरांचा पाडाव करून बादशहाची सुव्यवस्था लावून देण्याचें काम बाळाजी विश्वनाथानें पत्करिलें, तें पुरें करण्यांतच पानपताचा संग्राम उद्भवला. (४) राघोबाच्या भोळेपणामुळें काय काय अनर्थ राज्यावर गुदरले, हें इतक्या थोडक्यांत सांगणें शक्य नाहीं. पानपतचें प्रकरण विपरीत होण्याचें मूळकारण राघोबा होय. शिंदेहोळकरांत पडलेली फूट त्यास सांधतां आली नाहीं. उत्तरेंतील सर्व अव्यवस्थेच्या मुळाशीं ही फूट आहे. नानासाहेब पेशव्यानें उत्तरेकडील महत्त्वाचीं कारस्थानें राघोबासारख्या अनभ्यस्त मुलाकडे सोंपवून, स्वतः फक्त दक्षिण व कर्नाटक यांजकडेच लक्ष दिलें, ही त्याची मुख्य चूक होय. पावसाळा आला म्हणून राघोबास दक्षिणेंत परत येण्याचें कांहीं एक कारण नव्हतें. परंतु, कोणताही कारभार जबाबदारीनें अंगावर घेऊन तो तडीस नेण्याचें त्याचें शीलच नव्हतें. अबदालीचे अंगावर समोर चालून जाण्याचे प्रसंग आले असतां ते त्यानें मुद्दाम टाळले. ज्या गोष्टी स्वतःचे हातून रेटतना, त्यांचा हवाला तो शिंदे-होळकरांकडे देऊन आपण निसटून जाई या अवस्थेचें निस्तरण पुढें सदाशिवरावास भोवलें. (५) बाळाजी व सदाशिवराव यांच्या मनांत मराठी साम्राज्याच्या कल्पना एकाएकीं १७६० त घोळूं लागल्या, आणि त्यामुळें पानपतचा प्रसंग ओढवला, ही विचारसरणी डफसारख्यांनीं खुशाल स्वीकारावी; आपणास ती शोभणार सुद्धां नाहीं. नानासाहेब व सदाशिवराव इतके का मूर्ख होते? नाहीं. वास्तविक, साम्राज्याच्या कल्पनेचा अंगीकार बाळाजी विश्वनाथाच्या सल्ल्यानें शाहूनेंच स. १७१८ त केला होता, आणि त्याची पूर्तता करण्यांत तिघांही पेशव्यांनीं आपल्या सर्व जीविताची तपश्चर्या खर्चिली. पानपतचें अपयश गोविंदपंत बुंदेल्याच्या कुचराईला, अगर सदाशिवरावाच्या गर्वाला, किंवा नानासाहेबाच्या महत्त्वाकांक्षेला देऊन भागणार नाहीं. त्याचीं कारणें इतकीं खोल व विस्तृत आहेत कीं, तीं या लहानशा निबंधांत सांगणें शक्य नाहीं, लवकरच तीं अन्य रीतीनें वाचकांपुढें येणार आहेत.

विचारसरणीचा असा थोडाबहुत गोंधळ पुस्तकांत ठिकठिकाणीं आहे. परंतु, जसजशी चर्चा होऊन खऱ्याखोट्याचा निर्णय होईल तसतशा सुधारणा रा. मोडकांसारख्या लेखकांस करतां येतील. वादग्रस्त मुद्दे मुद्दामच टाळलेले दिसतात. कित्येक हृदयंगम प्रसंग सुटले आहेत. अनेक राष्ट्रीय स्त्रीपुरुषव्यक्तींचे व घराण्यांचे उद्योग पुस्तकांत दाखल नाहींत. परंतु, मुलांसाठीं लिहिलेल्या ह्या लहानशा पुस्तकांत अशा गोष्टींचा समावेश अशक्यच होय. एकंदरींत दुसऱ्या आधारयुक्त पुस्तकाचे अभावीं रा. मोडकांचा हा उद्योग फारच उपयुक्त असून त्यास पहिला स्वदेशी इतिहास म्हणतां येईल. अभ्यासानें व सतत उद्योगानें मनुष्य तयार होतो, हें ध्यानांत ठेवलें असतां रा. मोडक हे आपलें सामर्थ्य वाढवीत आहेत; आणि पुढें जातां जातां त्यांजकडून मोठ्या योग्यतेचे ग्रंथ निर्माण होतील, अशी आशा बाळगून हें परीक्षण संपवितों. **गो. स. स.**

---

## २. महाकवि–श्रीभासप्रणीतं पंचरात्रम्.

ह्या पुस्तकाची एक प्रत रा. वा. गो. ऊर्ध्वरेषे बी. ए. व पंडित श्रीकृष्णाचार्य शास्त्री यांचेकडून अभिप्रायासाठीं आली आहे. निवळ संस्कृत पुस्तकांवर किंवा संस्कृत पुस्तकांच्या टिप्पनीयुत आवृत्यांवर अभिप्राय देण्याचा विस्ताराचा परिपाठ नाहीं यामुळें या पुस्तकावर विस्तृत अभिप्राय देतां येत नाहीं. पंचरात्र हें तीन अंकी नाटक भासकवीचें म्हणून पुढें आलेलें आहे. पाण्डव वनवासांत गेल्यावर दुर्योधनानें यज्ञ केला व द्रोणाचार्यांना, “दक्षिणा मागा” अशी प्रार्थना केली. त्यावेळीं त्यांनीं “अर्ध




अनुक्रमणिका

राज्य पाण्डवांना दे " असें मागणें केलें. आणि "पांच रात्रींत पाण्डव शोधून काढल्यास मी तें देईन " असें दुर्योधनानें कबूल केलें. अशा प्रकारच्या कथेवर नाटकाची रचना केली आहे. मूळ नाटक फार लहान म्हणजे छापी ५४ पानें आहे. त्यावर संस्कृत टीका, इंग्रजी टीपा, इंग्रजी व हिंदी भाषांतर ( श्लोकांचें ), कठिण शब्दांचा कोश व तीन लहान पुरवण्या, इतकी सामग्री ह्या पुस्तकांत आहे. पंचरात्र हें नाटक अलाहाबाद युनिव्हर्सिटीनें इंटरमिजिएटचे विद्यार्थ्यांसाठीं नेमिलें आहे, व त्यांचेसाठींच प्रस्तुत आवृत्ति काढण्यांत आली आहे. मूळ नाटक बरेंच सोपें आहे. भासाचीं म्हणून जीं तेरा नाटकें हल्लीं उपलब्ध झालीं आहेत त्यांत 'पंचरात्र' हें बरेंच निकृष्ट ठरेल. ह्या लहानशा नाटकावर दोनतीनशें पानांचें विवरण आहे, तेव्हां त्यांत कठिण स्थलें विशेष राहिलीं नाहींत, हें सांगणें नकोच. आमचे मतें टीपा व टीका वगैरेंचा इतका विस्तार जरूर नाहीं. यामुळें, मियां मूठभर व दाढी हातभर अशी स्थिति होते. संस्कृत टीका बरी आहे. त्याचप्रमाणें इंग्रजी भाषांतर व टीपाही उपयुक्त आहेत. पुस्तकांत मुद्रणाचे दोष बरेच आहेत व कागद अगदीं हलका वापरला आहे. पण. हल्लींच्या कागदाच्या महागाईंत ग्रंथकारांचा नाइलाजच झाला असावा.

या पुस्तकांत एक मोठें वैगुण्य आहे तें हें कीं, त्याची प्रस्तावना चांगली नाहीं. भासकवींचीं म्हणून जीं नाटकें पुढें आलीं आहेत तीं त्याचींच आहेत कीं नाहींत या मुद्द्याचें चांगलें विवेचन करावयास पाहिजे होतें. त्याऐवजीं पंडित गणपतिशास्त्री (ज्यांनीं तेरा नाटकें भासाचीं म्हणून प्रसिद्ध केलीं) ह्यांच्या मुद्द्यांचा फक्त अनुवाद केलेला आहे; व उलट पक्षाच्या मतांची बोळवण एका वाक्यांत केली आहे कीं, त्यांचे मुद्दे केसांचा कीस काढण्याच्या पद्धतीवर गेले आहेत !

## ३. गुमानिकविकृत शतोपदेश–प्रबन्ध.

हें शंभर आर्यांचें ( शेवटच्या दोन धरून १०२ ) संस्कृत पुस्तक, इंग्रजी व मराठी अनुवादासह, चाफळचे पंडित हरिहरशास्त्री शहाणे यांनीं प्रसिद्ध केलें आहे. लहानशा प्रस्तावनेंत गुमानिकवि हा नांवावरून पाणिनि जैमिनि यांप्रमाणें प्राचीन असावा असें दर्शविलें आहे. क्षेमेन्द्रानें चारुचर्या हा ग्रन्थ ह्या ग्रन्थाचे मागून रचिला असें पंडित हरिहरशास्त्री यांचें मत आहे. गुमानिकवि कालिदासाचे पुष्कळ मागून झाला असावा. कारण, रघुवंशांतील अग्निवर्ण राजाची कथा ५१ व्या आर्येंत आली आहे. या ग्रंथांत महाभारत, रामायण, भागवत वगैरे ग्रंथांतील कथांचा उल्लेख करून त्या त्या कथेवरून प्रत्येक आर्येंत एक सर्वसाधारण सिद्धान्त सांगितला आहे. उदाहरणार्थ, ऐश्वर्य प्राप्त झालें असतां मदमत्त होऊं नये हा उपदेश, नहुषाची गोष्ट घेऊन ' स्वाराज्यमश्नुवानः प्रकोप्य नहुषो मुनीनहिर्भूत्वा । न्यपतत्त्वरितमधस्तात्प्राप्तैश्वर्यो न दृप्तः स्यात् ॥' या आर्येंत सांगितला आहे. या आर्यांचें मराठी भाषांतर बरें साधलें आहे. इंग्रजी भाषांतर तितकें सुबक वठलें नाहीं. छपाई चांगली आहे. क्वचित् संस्कृत श्लोकांतील शब्द तोडून छापण्यांत चुका झाल्या आहेत; उदाहरणार्थ ७, १२, १४ ह्या आर्या पाहा. पंडित हरिहरशास्त्री यांनीं पुस्तकाचे शेवटीं महाभारत, रामायण वगैरे ग्रंथांतून आर्येंत आलेल्या कथा कोठें कोठें सांपडतील तें दाखविलें आहे. यामुळें पुस्तक उपयुक्त झालें आहे. एकंदरींत संस्कृताचा अभ्यास करणाऱ्या विद्यार्थ्यांना व सर्वसाधारण पण बहुश्रुत होऊं इच्छिणाऱ्या वाचकांना हें पुस्तक उपयोगी आहे. या पुस्तकासारखेंच 'नीतिमञ्जरी' म्हणून एक पुस्तक आहे. त्यांत ऋग्वेदांतील कथा आधाराला घेऊन नीतितत्त्वांचा उपदेश केलेला आहे. उदाहरणार्थ 'सन्तः प्रभुत्वमापन्ना नोपकारं त्यजन्ति हि । ऋभवः प्राप्य देवत्वमृषेः पुत्रमजीवयन् ॥ ( साधुजन प्रभुपदाला पोंचले तरी उपकार करण्याचें व्रत सोडीत नाहींत. ऋभु देवपदाला पोंचल्यावरही त्यांनीं ऋषीच्या पुत्राला जिवंत केलें ). या श्लोकांत ऋग्वेद १–११०.८ यांतील कथेचा उल्लेख आहे. ह्या नीतिमंजरींतील वेंचे इंडियन अँण्टिक्वेरीच्या पांचव्या व्हाल्यूममध्यें दिलेले आहेत.

**पांडुरंग वामन काणे.**



# " म्हातारी " आणि केशवसुत.

[ काव्यदेवीचे ' नव्या दमाचे शिपाई ' सुविख्यात केशवसुत यांची " म्हातारी " नांवाची कविता अतिशय प्रसिद्ध आणि लोकप्रिय आहे. कित्येकांच्या मतें तर त्या कवितेंत कवित्वाचा चरमोत्कर्ष झाला आहे. माझ्या मतें कविकुलचक्रवर्तींच्या या कवितेंत दिसून येणारें कल्पनाप्रभुत्व कोणासही मोहवील. पण मी तिकडे भावनेच्या दृष्टीनें पाहात असल्यामुळें, उत्तरोत्तर विकास पावणाऱ्या त्या कल्पनांपासून अंतःकरणास गुद्गुल्या न होतां कशाघात झाल्याप्रमाणें तीव्र तीव्रतर वेदनाच होतात. ज्यांनीं केशवसुतांची मूळ कविता वाचिली असेल, त्यांनाच माझ्या कवितेंतील सौरस्य समजून येणार आहे. ]

गणमात्रा जुळिल्या । निर्मिलें काव्य नवें कविनें,
झालें ख्यात जनीं । डोलवीं हर्षुनिया सुमनें ! १
" काय कल्पना या ! । काय हा प्रतिभेचा पूर !
साध्या शब्दांचा । केवढा आहे मगदूर ! " २
लोकमुखांतूनी । चालला ऐसा जयघोष
कविराया ! तुजला । न व्हावा कां मग संतोष ? ३
पण हा कोणांत । खिन्न जन एक बैसलेला
त्याच्या हृदयांत । कोंदुनी शोकपूर गेला ! ४
येतें गायाला—कवीशा ! खुशाल तूं गावें;
पण औचित्याचें । विस्मरण न कदा तुज व्हावें. ५
प्रेतदहनकालीं गायनालाप कासया हे ?
अनुचित नर्तन हें । ज्या स्थळीं अश्रुपूर वाहे ! ६

× × ×

अल्लड तव बाला । करुनि वर हात धरूं पाही,
म्हातारी उडतां । सारखी खिदळत ती राही; ७
प्रसंग हा बघुनी । पडावें दडपण संसृतिचें,
कां मग कविराजा ! । निघालें तव चित्तावरचें ? ८
दीर्घवयोमानें । शुभ्र जी होउनियां गेली,
नाहीं घरदार । अशी जी भटकत दिन ढकली, ९
कांटेच्या झुडपीं । पडुनि वा रथ्याधूलींत
नाशुनि जायाची ।—तिच्यावर हें कसलें गीत ? १०
खिन्न, खिन्न हृदयें । अश्रुजड नयनिं जिला बघणें,
तिजवर कविराया ? । विरचिसी कसलीं हीं कवनें ? ११
ही स्फूर्ती अथवा । सांग त्या दीनेची थट्टा ?
कविपदवीला हा । खरोखर मज वाटे बट्टा ! १२
दारुण संसृतिचें । भयानक रूप जेथ दिसलें
तेथ निघायाचें । दडपण संसृतिचें कसलें ? १२
विसरूं वयहि नको, । उतरसी कुठला बाल्यांत ?
भयाण जेथ दिसे । आयुचा वा चरमप्रांत ! १३
' ते दिन पुष्पांचे । कोवळ्या किरणीं खेळाचे,
हे दिन चिंतांचे । परंतू लटिकें हंसण्याचें ! " १४
वृद्धांची थट्टा । करावी अज्ञबालकांनीं,
वृद्ध तूंहि असुनी बोल कां येति असे कानीं ? १५

\+ + +

म्हणावया अपुलें । न उरलें, म्हणुनी भटके जी
तिला कवे कां रे । ढकलिसी यक्षिणिच्या कुंजीं ? १६
गंधर्वाचें हें । वाटलें विमान का तुजला ?
अरसिक-राजा तूं । अधिप वा अदय जनांमधला ! १७
खपुष्प तिज गणुनी । रंगही लागसि शोधाया
हा मुग्धत्वाचा । जाहला कळसचि कविराया ! १८
जी तव बालेला । बघुनि ये वात्सल्यें जवळी
तिच्या हांसण्यानें । दूर जी खिन्न मनें गेली १९
ती तव हे बोल । ऐकुनी शरमुनियां भारी
घेणार न कां बा । घालुनी झुडपीं कांटेरी ? २०
तूं कविकुलराजा । सुकोमल हृदयाचा ख्यात
तुझे बोल असले ! । करिल कां ती न प्राणांत ? २१
धन्य कल्पना त्या । हृदय पण काय तुला नाहीं ?
शब्दांचीं जाळीं । क्षोभकर निर्मिलींस कां हीं ? २२
बसुनी मसणांत । भैरवी राग गायिलास
गायक तूं मोठा— । होय पण सहृदयतानाश ! २३
जी दीना बघुनी । गारठुनि वाक्शक्ती जावी
हर ! हर ! भलती ही । तदा का तुला स्फूर्ति व्हावी ?

**प. पां. रेंदाळकर.**






अनुक्रमणिका

# महाराष्ट्र-साहित्य-परिषदेच्या जमाखर्चाचा आढावा.

## ( मुंबई संमेलनाच्या वेळीं १९१५ मे रोजीं परिषदेस सादर केलेला हिशोब. )

| जमा | रु. | आ. | पै. | खर्च | रु. | आ. | पै. |
|---|---|---|---|---|---|---|---|
| चिटणिसांकडे असलेली शिल्लक | | | | बॉंबे ब्यांकिंग कंपनीकडे ठेव. | ६०० | ० | |
| १९१३ पासून १९१५ अखेरची. | ६६२ | २ | | अकोला संमेलन–रिपोर्ट छापण्याबद्दल | २३९ | ० | ० |
| साधारण सभासदांची वर्गणी | २२५ | | | इतर छपाई. | ४८ | | ० |
| तहाहयात सभासदांची वर्गणी | ३१५ | | | म. साहित्यपत्रिकेबद्दल वि.ज्ञा.वि.च्या | | | |
| देणगीची रक्कम | ५० | | | मालकांस१९१४सालाबद्दल देणगी. | १०० | ० | |
| रिपोर्ट–विक्री | २ | १० | ० | पोस्टेज, स्टेशनरी वगैरे | २४ | ० | ० |
| व्ही. पी. खर्च वसूल झाला तो. | ४ | ४ | | शिल्लक | २४८ | | ० |
| बेरीज | १२५९ | | | बेरीज | १२५९ | ० | ० |

मुंबई १९–५–१५

## [२० मे १९१५ पासून ६ मार्च १९१७ पर्यंतचा हिशोब.]

| जमा | रु. | आ. | पै. | खर्च | रु. | आ. | पै. |
|---|---|---|---|---|---|---|---|
| मागील शिल्लक | २४८ | ० | | श्री लक्ष्मीनारायण प्रेसला मुंबई-संमेलनाचा | | | |
| साधारण सभासदांची वर्गणी | २७४ | | | रिपोर्ट छापण्याबद्दल | ३५७ | ० | ० |
| तहाहयात सभासदांची वर्गणी | ४० | | | साहित्यपत्रिकेसंबंधानें वि.ज्ञा.विस्ता- | | | |
| बॉंबे बॅंकिंग कंपनीचे लिक्विडेटरकडून | | | | राच्या मालकांस १९१५ व१९१६ | | | |
| रुपयांस चार आणे प्रमाणें ६०० | | | | या दोन सालांबद्दल देणगी | २०० | ० | ० |
| रुपयांचा पहिला हप्ता आला तो. | १५३ | ३ | | इतर छपाई | ४ | ४ | ० |
| सदरहु रकमेवर दोन आणेप्रमाणें | | | | पोस्टेज स्टेशनरी वगैरे | ८ | ९ | ० |
| दुसरा हप्ता मिळाला तो. | ७६ | ९ | ६ | | | | |
| मे १९१५ मध्यें मुंबईस भरलेल्या | | | | एकंदर खर्च | ५६९ | १३ | ० |
| साहित्यसंमेलनाच्या खजिनदारां- | | | | | | | |
| कडून आलेली शिल्लक. | ५७७ | ५ | | **शिल्लक** | | | |
| चिटणिसांनीं मागाहून वसूल केलेली | | | | चिटणिसांकडे रोख ४०९–१३–३ | | | |
| रक्कम ( वसुलीखर्च वजा जातां) | १८९ | ४ | ३ | खजीनदारांचे नांवें बॅंकेंत ६२९-११-९ | | | |
| रिपोर्ट-विक्रीबद्दल | ३ | ६ | ० | | १०३९ | ९ | ० |
| ब्यांकेंतील रकमेस भर (खा. देणगी) | ० | ३ | ६ | | | | |
| व्याज ( १९१८ अखेर ) | ४७ | ६ | ९ | | | | |
| बेरीज | १६०९ | ६ | | बेरीज | १६०९ | ६ | ० |

मुंबई, १८–१–१९ } **रामकृष्ण रघुनाथ मोरमकर**, चिटणीस, म. सा. परिषद्.
**भास्कर महादेव पंडित**, खजिनदार, म. सा. परिषद्.

"वरील जमेचे व खर्चाचे आंकडे व शिल्लक चिटणीस यांनीं टिपणें दाखवून रुजू करून दिल्याप्रमाणें बरोबर आहेत. ब्यांकेंत असलेली शिल्लक, खजीनदार यांनीं पासबुक आणून दाखविली. बरोबर आहे. या बाबतींत अलाहिदा रिपोर्ट केला आहे. तारीख १९।१।१९

**य. वि. नेने.** आडिटर, म. सा. परिषद्.






अनुक्रमणिका

( मार्च १९१७ पासून १९१८ अखेर.)

| जमा | रु. | आ. | पै. |
|---|---|---|---|
| फेब्रुवारी १९१७ अखेर शिलक ऑडिटरच्या शेऱ्याप्रमाणें. | १०३९ | ९ | |
| वर्गणी तहहयात सभासद. | १९० | ० | |
| वर्गणी साधारण सभासद. | ५५४ | | |
| ग्रंथप्रकाशन फंड, इंदूर. | ५८९ | | |
| निबंधाकरितां रा. दाते यांजकडून. | ५० | | |
| देणगी महाराष्ट्र साहित्य संमेलन, इंदूर | ३०० | | |
| संमेलन-रिपोर्ट-विक्री. | २४ | १२ | |
| बॅंकेकडून व्याज १९१७ अखेर. | ६ | ४ | ७ |
| बॅंकेकडून व्याज १९१८ अखेर. | ३७ | २ | ८ |
| एकूण बेरीज | २७९० | १२ | ३ |

| खर्च | रु. | आ. | पै. |
|---|---|---|---|
| इंदूर परिषदेस जाण्यास चिटणीस यांस ५।३।१९१७ | १५ | ० | ० |
| परिषद रजिस्टर करण्यासाठीं अर्ज (इंग्रजी भाषांतरासह) १६।६।१७ | ४ | ८ | ० |
| परिषद रजिष्टर करण्यासाठीं फी. | ५० | ० | ० |
| १९१७ सालचें छपाईबील. | ४२ | ८ | ० |
| १९१७ सालचें पोस्टेज. | १७ | १० | ० |
| १९१८ सालचें छपाई बील. | ६ | ४ | ० |
| १९१८ सालचें पोस्टेज. | ६ | ४ | ३ |
| "विविधज्ञानविस्तार"च्या मालकांस म. सा. पत्रिकेसंबंधानें १९१७–१९१८ या दोन सालांबद्दलची देणगी. | २०० | | |
| " महाराष्ट्र भाषेचा इतिहास" लिहिण्यासाठीं रा. रा. चिंतामण वि. वैद्य यांस अनामत.— | ५० | ० | ० |
| पुस्तक-खरेदी. | ३४ | १५ | ६ |
| परिषदेच्या ट्रस्टींकडे कार्यकारी सभेच्या २।३।१९ च्या ठरावाप्रमाणें प्रॉमिसरी नोटा खरेदी करणेंसाठीं | १००० | ० | ० |
| इंदूर संमेलनाचे रिपोर्ट सभासदांकडे पाठविले, त्यांपैकीं व्ही. पी. परत आल्याबद्दल बुडित पोस्टेज. | १ | ९ | ० |
| | १४२८ | १० | ९ |
| खजिनदार यांजकडे ११८०-१०-६ | | | |
| चिटणीस यांजकडे १९१-१५-० | | | |
| | १३६२ | १ | ६ |
| एकूण बेरीज | २७९० | १२ | ३ |

☞इंदूर सरकारकडून आलेली दहा हजारांची रक्कम अर्थात् वरील हिशोबांत दाखल नाहीं. हे दहा हजार रुपये, आणि २ मार्च १९१९ भरलेल्या कार्यकारी सभेंत ठरल्याप्रमाणें मुंबईच्या खजीनदारांकडे असलेल्या शिलकीपैकीं एक हजार रुपये, परिषदेचे ट्रस्टी सर भालचंद्र कृष्ण, नाइट, आणि रा.रा. दामोदर गणेश पाध्ये यांच्या हवालीं करण्यांत आले; आणि या रकमेबद्दल १०२०० रुपयांचे ५॥ टक्क्यांचे वॉर बॉंड आणि १२०० रुपयांच्या पांच टक्क्यांच्या सरकारीं प्रॉमिसरी नोटा आपलेपाशीं असल्याबद्दल, आणि मुंबई ब्यांकेच्या शाखेत, व्याजसुद्धां, रु. ७६१–७–५ असल्याबद्दल त्यांचेकडून २० मे १९२० ची यादी दप्तरीं दाखल आहेत.

**रा. र. मोरमकर.**
**चिटणीस**, म. सा. परिषद.

२।९।१९. **रामकृष्ण रघुनाथ मोरमकर**, चिटणीस, म. सा. परिषद्.
**विनायक कृष्ण मुळे**, खजिनदार.





# हल्लींच्या संख्यावाचनपद्धतींतील अडचणी व त्यांवर उपाय.

[ प्रो. केशव रामचंद्र कानिटकर, एम्. ए., बी. एस्‌सी. ]

प्रत्येक मराठी शाळामास्तराची इच्छा अशी असते कीं, आपल्या ताब्यांत दिलेल्या वर्गांतील मुलें हुशार निघावीं, तीं वार्षिक परीक्षेंत पास व्हावींत, व आपणास शाबासकी मिळावी. त्याप्रमाणेंच हरएक पालकास असें वाटतें कीं, आपल्या चिमुकल्याचा विद्याप्रवेश सुलभ व्हावा व शक्य असल्यास एकेका वर्षांत दोन दोन इयत्ता ओलांडण्याची आपल्या मुलाची तयारी व्हावी. विशेषतः पहिल्या चार इयत्तेंत मुलें असतांना पालकांना ही घाई विशेष होत असते. ह्या दोघांच्या घाईमध्यें लहान मुलांचे फार हाल होत असतात. त्यांकडे जितकें जावें तितकें लक्ष गेलेलें दिसत नाहीं. कोणी पालक आपली लहानपणची आठवत असलेली हुषारी आपल्या मुलांत असलीच पाहिजे, असें गृहीत धरून त्यांकडून त्वरेनें विद्या संपादन करविण्याच्या नादांत असतो, तर दुसरे कित्येक पालक असें आहेत कीं, त्यांना आपल्या लहानपणांतील मठ्ठपणाची आठवण होऊन त्याबद्दलची जबाबदारी ते आपले पालक किंवा शिक्षक यांजवर ढकलूं पाहतात. अशा पालकांचीही इच्छा अशी दिसते कीं, स्वतःची जी काय लहानपणीं आबाळ झाली ती झाली, त्यास इलाज नाहीं; परंतु, ती स्थिति आपल्या मुलास मात्र प्राप्त होऊं नये, अशा इच्छेनें ते आपल्या लहानग्याच्या शिक्षणाकडे निदान कांहीं कालपर्यंत तरी लक्ष देतांना आढळतात. मुलांच्या शिक्षणाकडे मुळींच लक्ष न देणारेही कित्येक पालक आहेत. स्वतःस बरींच मुलें असल्यामुळें कित्येकांना सर्व मुलांच्या शिक्षणाकडे लक्ष देण्यास सवड होत नसेल. परंतु, असा मात्र अनुभव येतो कीं,एक दोनच ज्यांला मुलें आहेत असे बाप पहिल्या मुलाच्या शिक्षणाकडे २–४ इयत्ता होईपर्यंत तरी लक्ष देतांना आढळतात. पुष्कळ मुलेंबाळें पदरीं असल्यामुळें विटलेले व अन्य कारणांमुळें मुलांच्या शिक्षणाकडे लक्ष देण्यास सवड नसलेले पालक आपण सध्यां सोडून देऊं या. ज्यांना आपल्या चिमुकल्याच्या शिक्षणाबद्दलची कळकळ आहे अशाच पालकांच्यापुढें शिक्षणक्रमांतील अडचणी––शिक्षणपद्धतींतील दोष–ठेवणें बरें. परंतु, पालक काय किंवा शिक्षक काय परिस्थितीनें इतका बद्ध झालेला असतो कीं, चालू पद्धतींत कोणताही फरक करणें झाल्यास तो नाखूष असतो. क्षुण्ण मार्गानें जाण्याची हरएकाची साहजिक प्रवृत्ति असते. त्यामुळें कोणतीही नवीन गोष्ट सशास्त्र असली तरी ती वापरांत येण्यास फार त्रास पडतो. कोणताही पालक असो–विटलेला असो किंवा नसो–तो असें बोलतांना आढळतो कीं, अलीकडील शिक्षण पूर्वीच्या–म्हणजे त्याच्या लहानपणच्या–शिक्षणापेक्षां पुष्कळच निराळें,बरेंचसें कुचकामाचें झालें आहे.त्यावेळीं,म्हणजे ह्याचे लहानपणीं, हरएक शिक्षक मुलांना मोठ्या जरबेंत ठेवून त्यांजकडून धडे अगदीं बिनचूक पाठ करून घेत असत. एकदां मोडी अक्षर लिहिण्यास मांडी घातली कीं, २।२ तासपर्यंत ती मोडावयाची नाहीं. कित्ता व वळणें वरचेवर गिरवून झाल्यावर खर्डे लिहितांना जर का " श्रीमंत सकल गुणालंकरण " या मायन्यांतील " त " चा फटकारा बरोबर आला नाहीं, किंवा " स " चें वळण चुकलें, कीं बसलीच एक श्रीमुखांत, असले कडक त्यावेळचे शिक्षक ! नाहींतर आतांचे शिक्षक ! तसेंच आम्हांकडून सर्व उजळणी औटकीं–आकरकीं–एकोत्रींसह मारे तोंडपाठ करून घेतलेली; व शिक्षकानें प्रश्न विचारण्याचा अवकाश कीं फडाफड उत्तरें मिळालींच. तोंडचे हिशेब तर कांहीं विचारूंच नका. हिशेब घालण्याचा अवकाश कीं धडाधड पाट्या टाकल्याच. ह्या प्रकारचीं वर्णनें देणारे कित्येक पालक दृष्टीस पडतात. अशा पालकांपुढें शिक्षणपद्धतींतील अडचणी मांडल्या तर फारसा उपयोग होणार नाहीं अशी शंका वाटते. परंतु हेच पालक, सर्व नसले तरी निदान कांहीं, ज्यावेळीं आपल्या मुलाच्या शिक्षणाकडे पाहावयास लागतात त्या वेळची त्यांची मनोवृत्ति मात्र अगदीं निराळी दिसते. पोटच्या पोरांस ४।४,५।५ तास एकेठिकाणीं डांबून ठेवलेले पाहिलें, म्हणजे त्यांचीं मनें कळवळ-








अनुक्रमणिका

तांना दिसतात. मांडीवर मोडी अक्षर लिहिण्यापेक्षां तें मुलानें मेजावर लिहिणें बरें. आकरकीं, एकोत्रीं, औटकीं यांचा व्यवहारांत फारसा उपयोग नाहीं, याकरितां ही उजळणी मुलांकडून घोकून घेणें व्यर्थ श्रम नाहींत काय? असा प्रश्न विचारला जातो. सवायकीं, पाउणकीं यांचे दाही धडे पाठ करून घेण्यांत काय फायदा आहे? पहिले एक दोन धडे पाठ करून घेऊन बाकीचे नुसते दशक पाठ करून घेणें बरें नाहीं का? पण सहा ते आठ वर्षांच्या अर्भकांना निरर्थक घोकं-पट्टी करीत बसविणें हा एक मानवी प्राण्याविरुद्ध गुन्हा नव्हे काय? ज्या बालवयांत मुलांची जिज्ञासा अति जागरूक असते, अशा वेळीं नीरस धडे पाठ करून घेण्याऐवजीं त्यांची जिज्ञासा तृप्त होईल, असे व्यवसाय त्यांजकडून करून घेऊन त्यांच्या बुद्धीच्या विकासास अवकाश देणें शिक्षणशास्त्रदृष्ट्या अवश्य नाहीं काय? असे प्रश्न, आपल्या मुलांस जुन्या तऱ्हेनें शिक्षण घेत असतांना होणाऱ्या त्रासाकडे बघून या पाल-कांच्या मनांत जेव्हां उद्भवतांना दिसतात तेव्हां जरा हुरूप वाटतो व शिक्षणबाबतींतील अडचणी शिक्षक व पालक यांच्यापुढें मांडून पाहाव्यात, असें वाटावयास लागतें. 'अशक्य गोष्टी शक्य कोटींत आणण्याचा प्रयत्न करणारे गृहस्थ' अशीं जरी कोणीं नांवें ठेविलीं तरी त्यास न जुमानतां, बिचारी शिक्षक व पालक आपल्या सूचनांचा योग्य विचार करतील असा भरंवसा ठेवून, अंकलेखन व उजळणी ह्यांत ज्या कांहीं अडचणी अनुभवास आल्या त्या, व त्या अडचणी दूर करण्यास सुचतात ते उपाय, लोकांचे पुढें ठेविल्यास त्यांचा एकदम अव्हेर होणार नाहीं, अशी आशा आहे.

लहान मुलांस अक्षरें व अंक शिकविणें बरीच कठीण गोष्ट आहे, हें बहुतेक शिक्षकांस माहीत आहे. १ पासून ९ पर्यंत आकडे शिकवितांना जो कांहीं मुलांना त्रास होतो त्यापेक्षां १० व त्याच्या पुढील आंकडे शिकतांना लहान मुलांना फारच जड जातें. ११, १२ पासून २० पर्यंत थोडया बहुत कष्टानें धडा पाठ झाला असता; परंतु, त्यामध्यें १९ या आंकड्याची भानगड आल्यामुळें बरींच मुलें बावरलेलीं दिसतात. २० पुढील आंकडे शिकवितांना ते मुलांच्या लक्षांत राहावे म्हणून हरएक शिक्षक त्या आंकड्यांविषयीं समजूत मुलांना देऊं लागतो. मुलांकडून नुसती घोकं-पट्टी करून घेण्यापेक्षां आंकड्याविषयीं त्यांची समजूत करून देणें बरें, असें बहुतेकांचें मत आहे. स्मरणशक्ति वाढणें जरी इष्ट आहे तरी तिचा जर अंध स्मरण-शक्तींत विपर्यास होईल तर त्या स्मरणशक्तीचा कांहीं उपयोग नाहीं, असें आतां बहुतेकांस वाटूं लागलें आहे.

या समजुतीच्या पद्धतीनें शिकवितांना काय त्रास पडतो तो पाहूं या. २१ या संख्येच्या उच्चारामध्यें १ या आंकड्याचा निर्देश प्रथम असून विसांबद्दलचा आंकडा जो दोन त्याचा निर्देश मागून आहे. परंतु तीच संख्या लिहितांना २ पहिल्या प्रथम लिहावे लागतात, व एक मागाहून लिहावयाचा असतो. उच्चा-राची पद्धत उजवीकडून डावीकडे व लिहिण्याची पद्धत डावीकडून उजवीकडे असा परस्परविरोध असल्या कारणानें, दोहोंवर एक एकवीस, दोहोंवर दोन बावीस, दोहोंवर तीन तेवीस, असा पाठ द्यावा लागतो. या प्रकारें अठ्ठाविसांपर्यंत जमतें. परंतु, एकोणतीस या संख्येचा उच्चार लहान मुलांस फार गोंधळून टाकितो. एकोणतीस या संख्येंत दोन व नऊ असे दोन आंकडे आहेत. त्या दोहोंपैकीं एकाचाही उच्चार एकोण-तिसांत नाहीं; इतकेंच नव्हे तर, पुढें येणारा जो तीस आंकडा त्याचा निर्देश मात्र या उच्चारांत होतो. त्याचा परिणाम असा होतो कीं, मुलें एकोणतीस ही संख्या तिहींवर नऊ मांडून बहुतेक वेळां लिहून दाखवितात! उच्चार व लेखन यांमध्यें एक प्रकारची सांगड बसविण्याची प्रवृत्ति मुलांमध्यें साहजिकच असते; व तिजबरहुकूम एकवीसपासून अठ्ठावीसपयत कसें तरी जमतें; परंतु एकोणतीस या ठिकाणीं वर सांगितल्याप्रमाणें एकदम गडबड उडते. एका गृहस्थास चार पांच मुलें होतीं. त्यांतील सर्वांत लहान मुलाला, तूं सर्वांत लहान, असें म्हणून कोणी चिडवूं लागले. तेव्हां आपल्याला मोठा कसें म्हणवून घेतां येईल, सगळ्यांतला मी धाकटा भाऊ असें म्हण-वून न घेतां कोणाचा तरी थोरला भाऊ असें कसें म्हणवून घेतां येईल, याबद्दल तो विचार करूं लागला. तेव्हां त्यास एक युक्ति सुचली. कोणी एकानें तुझ्या भावंडांत तूं सर्वांत धाकटा भाऊ ना रे? असें विचार-तांच त्यानें उत्तर दिलें कीं, माझ्या आईस पुढें जें मूल होणार आहे त्याचा मी थोरला भाऊ आहे! या





अनुक्रमणिका

स्थानची जी स्थिति तीच एकोणतीस या संख्येची स्थिति आहे. तीस ही जी पुढली संख्या तींत एक उणा केला असतां होणारी जी संख्या ती मी, असें एकोणतीस ही संख्या सांगते. एकवीसपासून अठ्ठावीसपर्यंतच्या संख्यांना तुम्ही कोण, असे प्रश्न विचारले असतांना त्यांची उत्तर देण्याची पद्धत एक आहे; परंतु एकोणतीस या संख्येची पद्धत मात्र अगदीं भिन्न आहे. यामुळें मुलांचा फार घोंटाळा होतो हें हरएक शिक्षकास ठाऊक आहे.

तात्पर्य:—येथपर्यंत केलेल्या विवेचनांत विचार करण्याकरितां दोन प्रश्न पुढें मांडण्यांत आले. पहिला प्रश्न असा कीं, संख्यांचें वाचन व मांडणी हीं एकाच पद्धतीनें करितां येतील किंवा नाहीं. उच्चार किंवा वाचन उजवीकडून डावीकडे व लेखन डावीकडून उजवीकडे हा फरक काढून टाकून दोन्ही डावीकडूनच उजवीकडे करितां येतील किंवा नाहींत; व दुसरा प्रश्न असा कीं, एकोणतीस, एकोणचाळीस व एकोणपन्नास यांचीं नांवें इतर संख्यांस साजेशीं करितां येतील किंवा नाहींत. या प्रश्नाचीं उत्तरें सुचविण्यापूर्वी जरा थोडा जास्त विचार करणें बरें. निरनिराळे पाढे म्हणत असतां ज्या ठिकाणीं शंभरांपुढील संख्या येते अशा संख्यांची वाचणी कशी आहे तें पाहूं या. उदाहरणार्थ, बारांचा पाढा घेतला तर बारानव्वें अष्टोदरशें, बारादाहें विसाशें, अशी वाचणी जुन्या पद्धतीप्रमाणें आहे. ही वाचणी व एकवीस या संख्येची वाचणी एकाच पद्धतीनुरूप आहे. हर एक संख्येमध्यें एकं स्थानीं असलेल्या आंकड्याचा पहिल्या प्रथम उच्चार. नंतर दहं स्थानीं असलेल्यांचा, त्यानंतर शतं स्थानीं असलेल्यांचा, याप्रमाणें जुनी पद्धत दिसते. एकोत्र्यामध्यें सुद्धां याच पद्धतीचा अवलंब केलेला आहे. उदाहरणार्थ, एकसष्ठ एकसष्ठ, एकतीस सदतीस, यांमध्यें एकंचा उच्चार पहिल्या प्रथम, त्यानंतर दहंचा, त्याचेनंतर शतंचा, व त्यानंतर सहस्रचा केला आहे. ही पद्धत एका दृष्टीनें सयुक्तिकही आहे; परंतु, संख्या लिहिण्याची पद्धत त्याबरहुकूम नसल्यानें फार घोंटाळा होतो. या पद्धतीनें लिहिणें झाल्यास पहिल्या प्रथम एकं स्थानचा आंकडा, नंतर दहं स्थानचा आंकडा, नंतर शतंचा, असें लिहीत गेलें पाहिजे. एरवींची लेखनपद्धति उर्दू व पर्शियन भाषांतून उजवीकडून डावीकडे आहे. त्या पद्धतीचें अनुकरण केल्यानें एकं स्थानचा आंकडा सर्वांत उजवीकडे, दहं स्थानचा आंकडा त्याचे डावीकडे, असें मांडीत गेलें पाहिजे. असें केलें असतां उच्चार व मांडणी यांत सुसंगतपणा राहील. हा सुसंगतपणा पूर्णपणें अमलांत आणावयाचा असेल तर पाटीच्या किंवा कागदाच्या उजवीकडील बाजूस लिहिण्यास प्रारंभ केला पाहिजे. पाढा लिहिण्यास प्रारंभ करितांना उजवे बाजूस रेघ मारून तिच्या डावीकडे आंकडे मांडण्यास सुरवात केली पाहिजे. याप्रमाणें पद्धति स्वीकारल्यास एक खरा फायदा आहे. तो असा कीं, पाढ्यांतील हरएक संख्येमधील एकं स्थानचे आंकडे एकाखालीं एक येतील. तसेच दहं स्थानचे आंकडे एका खालीं एक बिनचूक येऊन शतं स्थानच्या आंकड्यापाशीं त्यांचा घोंटाळा होणार नाहीं; व त्यामुळें बेरीज करितांना विशेष सोय होईल. पण हें सर्व घडावें कसें? मराठी भाषेंतील लेखनपद्धति डावीकडून उजवीकडे आहे. अक्षरें असोत किंवा आंकडे असोत, बहुतेकांचा प्रारंभ डावीकडे असून शेवट उजवीकडे झालेला असतो. तीन व सहा हे आंकडे व ज हें अक्षर कांहीं अंशीं अपवाद आहेत. तेव्हां आतां प्रश्न असा कीं, नवशिक्या मुलांचा घोंटाळा नाहींसा करावयाचा झाल्यास संख्यांची वाचणीच बदलली पाहिजे. ती वाचणी डावीकडून उजवीकडे करणें झाल्यास एकवीस, बावीस, तेवीस यांच्या ऐवजीं वीसएक, वीसदोन, वीसतीन, अशी करावी लागेल. या प्रकारच्या वाचण्या कानडी, तेलगू व इंग्रजी या भाषांतून आहेत. ट्वेंटिवन, ट्वेंटिटू अशी वाचणी इंग्रजींत आहे; तेलगूमध्यें इरवयी वकटी, इरवयी रेंडू व इरवयी मुडू अशी वाचणी आहे; व कानडीमध्यें इप्पत्तुवन्दु (२१), इप्पत्तुयाड्डु (२२) व इप्पत्तुवंभत्तु (२९) अशी वाचणी आहे. कुणबी लोक किंवा आपल्या बायका यांमध्येंही कांहीं कांहीं संख्यांची वाचणी या रीतीस धरून आहे. तेहेतिसाच्या ऐवजीं तीसतीन अशी वाचणी कुणबी लोकांच्या तोंडामध्यें पुष्कळांनीं ऐकली असेल. यावरून तीसतीन या वाचणींत सुगमता जास्त आहे, असें उघड दिसतें. तेव्हां सूचना अशी कीं, वीसएक, वीसदोन, वीसतीन; तीसएक, तीसदोन, तीसतीन; चाळएक, चाळदोन, चाळतीन; पांचएक,




अनुक्रमणिका

पांचदोन, पांचतीन; साएक, सादोन, सातीन; सातएक, सातदोन, साततीन; आठएक, आठदोन, आठतीन; नऊएक, नऊदोन, नऊतीन; अशी वाचणी सुरू करावी. या तऱ्हेची अर्धवट वाचणी अलीकडे सुरू आहेच. चौदोदशें म्हणण्याचे ऐवजीं एकशें चवदा, चवेचाळीसाशेंचे ऐवजीं एकशें चव्वेचाळीस, अशी परोत्प्न सांगण्याची रीति निदान कांहीं कांहीं संख्यांसंबंधीं तरी सुरू दिसते. चवोदशें व चवदोदशें या दोहोंत मुलांचा नेहमीं घोंटाळा होतो. तो नाहींसा करण्याकरितां एकशें चार व एकशें चवदा अशी वाचणी कित्येक शाळांतून देतांना आढळते. इतकें कशाला, एरवींच्या व्यवहारांत सुद्धां १५२ आंबे विकत घेतले असतां, आम्ही बावन्नाशें आंबे विकत घेतले असें न सांगतां एकशें बावन्न आंबे विकत घेतले असें सांगतों. २५५२ रुपये मोजून घेतल्यावर किती रुपये घेतले, असा जर प्रश्न कोणी विचारला तर त्यास बावन्न पंचवीस, असें उत्तर न देतां दोन हजार पांचशें बावन्न किंवा पंचवीसशें बावन्न असेंच उत्तर आपण देऊं.–तात्पर्य काय कीं, तीन-आंकडी किंवा चार-आंकडी संख्येचें वाचन अर्धवटपणें तरी निदान आपण डावीकडून उजवीकडे करितों. फक्त दशं व एकं यांनीं होणाऱ्या संख्येचा उच्चार मात्र आपण जुन्या तऱ्हेप्रमाणें अजून करीत आलों आहोंत. यावरून असें दिसतें कीं, जुन्या पद्धतींत फरक आपण मुळींच केला नाहीं, असें नाहीं. फक्त तो पूर्णपणें करावयाचा कीं नाहीं, हा आतां आपणांपुढें प्रश्न आहे. सुचविलेल्या पद्धतीप्रमाणें २५५२ या संख्येचा उच्चार दोन हजार पांचशें पांच दोन, असा होईल. हा तसा करावयाचा कीं नाहीं या प्रश्नाचा निकाल सर्वांच्या संमतीनें लावावयाचा आहे. या पद्धतीनें शिकलेल्या मुलांची कांहीं दिवसपर्यंत व्यवहारांत त्रेधा उडेल ही अडचण खरी आहे. परंतु या व असल्या गोष्टी बेताबेतानें करीत गेल्यास अपाय न होतां त्या उपायच करतील.

आतां दुसरा प्रश्न १९, २९, ३९, ४९, ५९ वगैरे संख्येच्या नांवाबद्दलचा आहे. एकोणीस, एकोणतीस, एकोणचाळीस अशीं नांवें किती घोटाळा उत्पन्न करितात हें सर्व शिक्षकांना माहीत आहे. यास उपाय ही सोपा आहे. आपण १०० पर्यंतच्या ह्या प्रकारच्या सर्व संख्यांचा विचार केला तर त्यांतच ह्या प्रश्नाची सोडवणूक आहे. ९९ ह्या संख्येची वाचणी एकोण शंभर अशी नसून नव्याण्णव अशी आहे. एकोणतीस वगैरे प्रमाणें वाचणी ठेवावयाची झाल्यास ९९ ची वाचणी एकोणशंभर अशी असावयास पहिजे. दुसरी अशी एक संख्या आहे कीं, तिची वाचणी दोनतऱ्हेची आहे. ती संख्या ८९ ही होय. एकुणनव्वद ही वाचणी एकोणतीस ह्या धर्तीवर आहे. तिची दुसरी वाचणी नव्यायशीं अशी आहे. ही वाचणी सर्व ठिकाणीं व सर्वसम्मत जरी नसली तरी कांहीं कांहीं ठिकाणीं ती चालू आहे. ८९ व ९९ ह्यांच्या वाचणीवरून आपल्यास २९, ३९ वगैरेंची सुगम वाचणी बनवितां येईल, नव्वीस, नौतीस, नौचाळीस, नव्वावन, नौसष्ट, नव्याहत्तर, अशी वाचणी २९, ३९, ४९, ५९, ६९, ७९ ह्या संख्यांची केल्यास त्या संख्यांस सुगमता प्राप्त होईल, व विद्यार्थ्यांचे हाल चुकतील. संस्कृतमध्यें अशा संख्यांस दोन दोन नांवें आहेत. एकोनत्रिंशत्, नवविंशति हीं दोन नांवें २९ चीं आहेत. एकोनचत्वारिंशत् व नवत्रिंशत् हीं ३९ या संख्येचीं आहेत. यांपैकीं नवविंशति व नवत्रिंशत् या पद्धतीनें पाहतां नऊवीस नऊतीस ही वाचणी सर्वसंमत होण्यास कांहीं हरकत नाहीं. २९, ३९ या संख्यांची ज्या पद्धतीनें सध्या वाचणी आहे तशी वाचणी लॅटिनमध्येंही आहे. १८ या संख्येची "Deo de viginti" म्हणजे दोन उणे वीस, व १९ ह्या संख्येची "un-de-viginti" म्हणजे एकोणवीस अशी वाचणी आहे.

जोंपर्यंत लिहिण्याची पद्धत डावीकडून उजवीकडे व वाचणी उजवीकडून डावीकडे असें राहील तोंपर्यंत नऊवीस, नऊतीस हीच वाचणी इष्ट ठरेल. परंतु लिहिण्याची पद्धत व वाचण्याची पद्धत एकसारखी करावयाची झाल्यास वीसनऊ, तीसनऊ, चाळनऊ, अशी वाचणी २९, ३९ या संख्यांस द्यावी लागेल. १९ ह्या संख्येस पहिल्या सुधारणेप्रमाणें नव–दाव दुसरीप्रमाणें दहा–नऊ, अशी वाचणी दिली पाहिजे. ह्या सुधारणा दोन्ही एकदम करावयाच्या किंवा यांपैकीं एकच करावयाची या प्रश्नाचा सर्व लोकांनीं विचार केला पाहिजे.



येथपर्यंत साध्या संख्यावाचनांत येणाऱ्या अडचणींचा विचार झाला. याच प्रकारची विचारपद्धति पावकीं, पाउणकीं व सवायकीं या बाबतींत लागू केल्यास काय होतें तें पाहणें आहे. पावक्यांमध्यें ज्या ज्या ठिकाणीं पाव उणा अमुक अशी संख्या येते त्या त्या ठिकाणीं मुलांचा घोंटाळा झाल्याखेरीज राहात नाहीं. पावणेतीन ह्या संख्येच्या लेखनांत तीन हा आंकडा येत नाहीं. पावउणे पंचवीस, पावउणे सहवीस या संख्यांमध्यें पांच सहा हे आले नाहींत. ज्या मुलास एकोणतीस एकोणचाळीस या संख्या मांडतांना संशय उत्पन्न होतो, त्यास पावणेएकोणतीस, पावणेएकोणचाळीस या संख्या लिहावयास सांगितल्यास त्याचा घोंटाळाच घोंटाळा उडून जातो. पाऊण ही संख्या एकोणतीस एकोणचाळीस या पद्धतीची आहे. पुढें येणाऱ्या संख्यांमधून एक उणा केला असतां एकोणतीस, एकोणचाळीस या संख्या होतात. त्याचप्रमाणें कोणत्याही संख्येंतून पाव उणा केला असतां, त्याच्या आलीकडील संख्या अधिक पाउण, अशी संख्या तयार होते.

पावकीं, पाउणकीं व सवायकीं यांचे धडे लिहितांना मुलें फार चुका करतात हा सार्वत्रिक अनुभव आहे. त्याचें मुख्य कारण मुलांचा मठ्ठपणा हें नसून ही संख्या-मांडणी इतर संख्यांच्या मांडणीसारखी नाहीं हें होय. आपली बुद्धि चालवून हरएक गोष्ट समजवून घ्यावी अशी ज्या वयामध्यें मुलांची विशेष प्रवृत्ति दिसते त्या वयांत या असंबद्ध रीति त्यांच्या अभ्यासांत आल्यामुळें बुद्धिविवेकास मदत तर होत नाहींच, परंतु मठ्ठपणास मात्र उत्तेजन मिळतें. ही स्थिति नाहींशी करणें झाल्यास या बाबतींत सुद्धां बरीच उलथापालथ केली पाहिजे. पाव, अर्धा, पाऊण हे $\frac{१}{४}$, $\frac{१}{२}$, $\frac{३}{४}$, ह्या अपूर्णांकांचीं नांवें आहेत, असें एकदां ठरवून टाकलें पाहिजे. पाऊण ह्याचा अर्थ करीत बसल्यास एकांत पाव उणा केल्यावर जो अपूर्णांक होतो त्यास पाऊण म्हणावें असा त्याचा अर्थ आहे. तीन चतुर्थांश असा अर्थ त्याच्या नांवांतून प्रत्यक्ष निघत नाहीं. ह्याकरितां अर्थाकडे लक्ष न देतां पाव अर्धा पाऊण ह्या $\frac{१}{४}$ $\frac{१}{२}$ $\frac{३}{४}$ ह्या अपूर्णांकांच्या संज्ञा मानून पुढें चाललें पाहिजे. असें केल्यावर सव्वा ही संख्या एक पाव अशी वाचावी लागेल; सव्वादोन ह्या संख्येस दोनपाव म्हणावें लागेल. असें केल्यानें उच्चार व लेखन हीं दोन्हींही डावीकडून उजवीकडे होतील. ३॥। ह्यास तीन पाऊण, अशी वाचणी द्यावी लागेल. २८॥। ह्या संख्येस अठ्ठावीस पाऊण किंवा विसाठपाऊण अशी वाचणी देणें अवश्य पडेल. सध्यां तिची वाचणी पावणेएकोणतीस अशी आहे. ह्या दोहोंतील सुगम कोणता ह्याचा विचार करून विसाठपाऊण ही सुगम ठरल्यास ती चालू केली पाहिजे. तसें केल्यानें मुलांचे उजळणी शिकण्यांत होणारे हाल व कालापव्यय पुष्कळ कमी होईल, ह्यांत संदेह नाहीं. ही नवी रीत जर स्वीकारली गेली तर पावकीं वगैरेंच्या पाढ्यांची वाचणी कशी होईल तें पाहूं या. ह्या वाचणीचा विचार करण्यापूर्वीं सव्वा, साडे हे दोन पाव व अर्धा दाखविणारे उपसर्ग यांचा विचार केला पाहिजे. सव्वा म्हणजे एक व पाव असा पहिला अर्थ आहे. परंतु, त्याच शब्दांचा ज्या वेळेस उपसर्गासारखा उपयोग केला जातो त्यावेळीं त्यांचा अर्थ पाव इतकाच आहे. याकरितां तोच शब्द दोन अर्थीं योजणें इष्ट नाहीं. शिवाय सर्व वाचणी डावीकडून उजवीकडे आणावयाची तर पावदर्शक शब्द संख्येच्यापूर्वीं येण्याऐवजीं पुढें आला पाहिजे. उदाहरणार्थ, सव्वातेरा असें म्हणण्याऐवजीं तेरासव्वा किंवा तेरापाव असें म्हटलें पाहिजे. तेरासव्वा या ठिकाणीं सव्वा हा पावदर्शक प्रत्यय मानिला तर तेरासव्वा याच्या योगानें तेरा अधिक पाव असा अर्थ होईल. परंतु, हा घोंटाळा तेरा पाव असें म्हटल्यानें पुरा नाहींसा होतो. याकरितां सव्वा या शब्दाचा उपसर्ग किंवा प्रत्यय या दृष्टीनें उपयोग करूं नये, हें बरें. ज्याला सध्यां आपण सव्वादोन, सव्वातीन, सव्वाचार म्हणतों त्या संख्या दोनपाव तीन-पाव, चार-पाव अशा वाचल्या पाहिजेत. तसेंच साडेतीन, साडेचार, साडेपांच याऐवजीं तीनसाडे, चारसाडे, पांचसाडे असें तरी म्हणावें किंवा तीनअर्धा, चारअर्धा, पांचअर्धा असें तरी म्हणावें, पाऊण हा शब्द तीन चतुर्थांशवाचक मानावा, व पावणेबारा, पावणेतेरा, पावणेचवदा यांची वाचणी, अकरा-पाऊण, बारा-पाऊण, तेरा-पाऊण, अशी करावी. ह्या [illegible] ठरल्यानंतर एरवींचा [illegible] किंवा तिहींचा पाढा आपण कसा वाचतों तें अगोदर लक्षांत आणिलें पाहिजे. तिहींचाच पाढा आपण घेऊं या. या पाढ्यांत





अनुक्रमणिका

तीन एके, तीन दुणें, तीन त्रिक, तीन चौक, अशी वाचणी आहे. याचा अर्थ असा आहे कीं, पहिले प्रथम पटीचा उच्चार, नंतर ज्याची पट त्या आंकड्याचा अथवा समुच्चयाचा उच्चार, अशी वाचणी आहे. कोणचाही पाढा घेतला तरी अशीच वाचणी आहे. पण समज मात्र याच्या उलट आहे. त्रेत्रिक सहा, ह्यामध्यें सहा ही तिहींची दुप्पट आहे कां दोहोंची तिप्पट आहे ? तसेंच चारत्रिक बारा, यांत बारा हें चाराची तिप्पट म्हणून सांगितलेलें आहे कां तिहींची चौपट म्हणून सांगितलेलें आहे ? त्रिक चौक वगैरे शब्द तिहींचा समूह, चारांचा समूह दाखविणारे शब्द आहेत. तीन चौक बारा, यांत चोक हा चारांचा एक समूह धरून त्याची तिप्पट केलेली आहे. परंतु चार त्रिक बारा, यांत त्रिक म्हणजे तिहींचा एक समूह धरून त्याची चौपट केली आहे. या दृष्टीनें विचार करितां ज्यास आपण बेचा पाढा म्हणतों त्यांत निरनिराळ्या संख्येच्या दुप्पटी व तिहींच्या पाढ्यांत तिप्पटी, चोहोंच्या पाढ्यांत चौपटी सांगितल्या आहेत, असें सहज लक्षांत येईल. या पाढ्यांतून पटीचा उच्चार पहिल्या प्रथम, समूहाचा किंवा गटाचा उच्चार त्यानंतर, व शेवटीं समूहाची पट केली असतां होणारी जी संख्या तिचा उच्चार होतो. या गोष्टी लक्षांत आणिल्यानें असें म्हणावें लागतें कीं, पावकीं निमकीं वगैरेंची वाचणी साध्या पाढ्यांच्या वाचणीसारखी नाहीं. ती तशी करावयाची झाल्यास पटीचा उच्चार पहिल्या प्रथम केला पाहिजे, समूहाचा उच्चार नंतर, व शेवटीं समूहाची पट केली असतां होणारी जी संख्या तिचा उच्चार केला पाहिजे. या दिशेनें पावकीचा पहिला पाढा वाचूं या. पाव एकें पाव, पावदुणें अर्धा, पाव त्रिक पाऊण, पाव चोक एक, पाव पाचा एक पाव, पाव सख एक अर्धा (दीड), पाव सत्तें एकपाऊण, पाव आठें दोन, पाव नवें दोन पाव, पाव दाहें दोन अर्धा ( अडीच ).तसेंच पावचाळ एक दहापाव, पावचाळ दोन दहाअर्धा, पाव चाळ तीन दहापाऊण, पावचाळ चार अकरा, पावचाळ पांच अकरा... पावचाळ सा अकराअर्धा, पावचाळ सात अकरापाऊण, पावचाळ, आठ बारा, पाव चाळ नऊ बारा पाव, पावपन्नास बाराअर्धा. याप्रमाणें वाचणी अथवा परोचा म्हटल्या पाहिजेत. सवाकीं-पाऊणकींचीही वाचणी याप्रमाणेंच केली असतां ज्या गोष्टी साधतात त्या येणेंप्रमाणें: लिहिण्याप्रमाणें वाचणी डावीकडून उजवीकडे होते. सर्व पाढ्यांची पद्धत एकच राहते. म्हणजे पहिला उच्चार पटीचा, दुसरा उच्चार समूहाचा व तिसरा उच्चार तयार होणाऱ्या संख्येचा. पाऊण ह्या शब्दाचा उपपदाप्रमाणें उपयोग करण्याचें सोडून दिल्यामुळें पावणेएकोणतीस ह्या व अशा इतर संख्या मांडण्यांत होणारा घोंटाळा नाहींसा होतो.

आतां ह्या ज्या नवीन गोष्टी सुचविल्या ह्या प्रत्यक्ष कृतींत उतरण्यास काय काय अडचणी येतील त्यांचाही उल्लेख करणें जरूर आहे. मुलांना ह्या नव्या पद्धतीनें त्रास होईल कीं काय ? ज्या मुलांना पहिले प्रथमच ह्या गोष्टी शिकावयाच्या आहेत त्यांना जुन्या पद्धतींत व नव्या पद्धतींत फरक वाटणार नाहीं. कोणती तरी एक पद्धत घेतली व त्या पद्धतीनें सर्व उजळणी शिकविली असतां ती तशीही तयार होईल. बारानवें अष्टोदर्शे, बारा दाहीं विसाशें, ह्या वाचणीच्या ऐवजीं बारानवें एकशेंआठ,बारादाहीं एकशेंवीस,अशी वाचणी दिली असतां तितक्याच सफाईनें पाढे पाठ होतात व त्या वाचणींत मुलांना चमत्कारिकपणा मुळींच वाटत नाहीं. परंतु कांहीं वेळ एक वाचणी व कांहीं वेळ दुसऱ्या तऱ्हेची वाचणी, असें केलें असतां मात्र मुलांचा घोंटाळा होतो असा अनुभव आहे.

दुसरी जी अडचण येण्याचा संभव आहे ती शिक्षक व पालक यांजकडून होय. आतांपर्यंत सर्व शिक्षक व पालक ह्यांचें शिक्षण मामूल पद्धतीनें झालेलें असल्याकारणानें ही नवीन वाचणी व रीति त्यांना कशीशीच वाटणार. नवीन पद्धतीनें बारानवें एकशें-आठ, बारादाहीं एकशेंवीस, असा पाठ देण्यास शिक्षकास सांगितलें असतां त्यानें तक्रार अशी केली कीं, हा पाठ मुलांना त्रासदायक होईल. वस्तुस्थिति अशी होती कीं, वर सांगितल्याप्रमाणें मुलांस नवी व जुनी पद्धति ह्यांमध्यें फरकच ठाऊक नव्हता. त्यामुळें त्यांना दोन्हींपैकीं कोणताही पद्धति सारखीच कठीण होती. मुख्य अडचण होती ती शिक्षकांचीच. जुन्या पद्धतीची वाचणी तोंडांत बसलेली



असल्यामुळें नव्या पद्धतीकडे त्यांचें तोंड येईना. परंतु कांहीं दिवस नव्या पद्धतीनें, कष्टानें कां होईना, परोचा सांगितल्यावर त्याच शिक्षकाच्या लक्षांत असें आलें कीं, मुलांना नवी पद्धति मुळींच कठीण जात नाहीं; फक्त स्वतः आपल्याला मात्र त्रास पडतो. हा सर्व खेळ मनाच्या जाड्याचा ( Mental Inertia ) आहे. नव्या पद्धतीच्या विरुद्ध ह्याहीपेक्षां ज्यास्त जोराचा विरोध पालकांकडून, व विशेषत: जे पालक आपल्या मुलांच्या शिक्षणाकडे लक्ष देणारे आहेत त्यांजकडून, येण्याचा संभव आहे. जरी अशा पालकांकडून प्रथम थोडा विरोध झाला तरी असले पालक विचारी गृहस्थ असल्यामुळें त्यांचेकडूनच शेवटीं चांगली मदत होणार आहे, असा मला भरंवसा आहे. इंग्रजींतून ज्ञान संपादन करावें लागल्यामुळें व त्या भाषेंतून परीक्षा द्यावयाच्या असल्यामुळें विद्यार्थ्यांच्या बुद्धीस किती विनाकारण ताण बसतो हें अशा विचारी पालकांस माहीत आहे. निदान प्रवेशपरीक्षेपर्यंत तरी सर्व शिक्षण मातृभाषेंतून झालें पाहिजे. इंग्रजी हें माध्यम नको, अशी योग्य ओरड जिकडे तिकडे अलीकडे ऐकूं येते. जे विचार ह्या ओरडीस प्रवृत्त करितात त्याच विचारांचा ओघ ह्या गोष्टीकडेही वळावयास नको काय ? तसें होईपर्यंत मुलांना बराच त्रास सोसावा लागणार ह्यांत कांहीं शंका नाहीं.

मुलांना त्रास कसा सोसावा लागतो ह्याचें एक उदाहरण घडलें तें असें. ' डेक्कन एज्युकेशन सोसायटी'च्या नवीन मराठी शाळेची देखरेख करण्याचें काम सध्या मजकडे दिलेलें आहे. देखरेखीचें काम करीत असतां एकदा मी दुसऱ्या यत्तेच्या एका तुकडींत गेलों व त्या तुकडींतील मुलांचा परोचा कितपत तयार आहे हें पाहण्याच्या उद्देशानें एका मुलास मी बाराचा पाढा म्हणावयास सांगतलें. असें सांगतांच मुलानें उलट प्रश्न विचारला कीं, पाढा मी घरच्यासारखा म्हणूं किंवा तुमच्यासारखा—म्हणजे शाळेंतील पद्धतीप्रमाणें म्हणूं ? मुलांना ह्या दोन निरनिराळ्या पद्धतीमुळें किती त्रास पडत असेल ह्या गोष्टीचा विचार मजपुढें ा प्रश्नामुळें उभा राहिला. मुलाच्या प्र... तं ...ळेंल त्या पद्धतीनें म्हण, असें मीं उत्तर बरोबर जुन्या पद्धतीनें त्याने पाढा म्हणून तो संपल्यावर शाळेंतील रीतीनें तुला म्हणतां येतो काय, असा प्रश्न विचारतांच, होय म्हणून, त्यानें १२-च्या पाढ्यास पुनः सुरवात केली, व म्हणत म्हणत बारानवें एकशें आठ, बारादाहीं एकशेंवीस असें म्हणून त्यानें पाढा संपविला. ह्या दोन्ही पद्धतीनें म्हणण्यांत सारखीच सफाई त्या मुलानें दाखविली. परंतु ह्यावरून असें मात्र माझ्या नजरेस आलें कीं, या मुलाचे पालक त्याजकडून घरीं उजळणी म्हणून घेत असले पाहिजेत व ह्या त्यांच्या मुलांच्या शिक्षणाबद्दलच्या कळकळीमुळें मुलास बराच त्रास होत असला पाहिजे. शाळेंत एक पद्धति व घरीं दुसरी, अशी स्थिति झाल्यामुळें होणारा विनाकारण त्रास टाळण्याच्या इच्छेमुळेंच ही बाब बहुजनसमाजापुढें मांडून मगच नव्या रीतीचा सरसहा अवलंब करणें बरें, असें वाटल्यावरूनच हा लेख लिहिण्यास मीं प्रवृत्त झालों.

असो. आतांपर्यंत ज्या सूचना केल्या त्यांतील बाकीच्या सूचना एका बाजूला ठेविल्या तरी, १९, २९ वगैरे संख्यांचीं नांवें बदलून नऊ दहा, नव्वीस अशीं करावींत ह्या एका सूचनेचाच विचार करून ती अमलांत आणल्यास बराचसा सोपेपणा उजळणी शिकण्यांत मुलांना येईल. प्रारंभीं नवीन सुचविलेलीं नांवें शिकवून मुलांना दुसऱ्या यत्तेमध्यें एकोणीस, एकोणतीस हीं जुनीं नांवें शिकवावींत. म्हणजे व्यवहारदृष्ट्या अडचण पडणार नाहीं. ही एक सुधारणा झाली. परंतु यापेक्षांही महत्त्वाची सुधारणा म्हणजे संख्यांचें वाचन व लेखन. हीं दोन्हींही एकसारखीं—म्हणजे डावीकडून उजवीकडे करण्याची सुधारणा घडवून आणणें हें फार महत्त्वाचें आहे. आजपर्यंतची परंपरा अमूक आहे व ती सोडून कशी द्यावी, अशा विचारानें ह्या सूचनेचा विचार करणें बरोबर होणार नाहीं. ही सुधारणा पूर्णपणें अमलांत येण्यास कांहीं दिवस लागतील हें खरें. परंतु, ज्यांना म्हणून ही पटेल त्यांनीं ती अमलांत आणावी, व त्यांस हरएक विचारी माणसानें व शाळाखात्यानें मदत केली पाहिजे. ज्या ... तऱ्हेनें उजळणी शि...




अनुक्रमणिका

रणांविरुद्ध नाकें मुरडलीं गेलीं तरी थोड्या वर्षांत ती सर्व-संमत होईल. या सुधारणेचा विचार बहुजनसमाजाच्या दृष्टीनें केल्यास असें आढळून येईल कीं, ज्या मुलांचे घरीं पालक त्यांच्या शिक्षणाबद्दल काळजी घेत नाहींत किंवा घेऊं शकत नाहींत त्या मुलांना बिगिनर (Beginner ) यत्तेमध्येंच फार काळ कंठावा लागतो. पांढरपेशा जातीशिवाय इतर जातींस फारसें शिक्षण मिळालें नाहीं अशा जातींतील मुलांना बिगिनर(बिगारी!) व पहिल्या यत्तेंतच फार काळ क्रमावा लागतो. यास जीं कारणें आहेत त्यांतील सध्यांची संख्यालेखन व वाचन यांतील विसंगतता हें एक बलवत्तर कारण आहे. याशिवाय सध्यां जिकडे तिकडे प्राथमिक शिक्षण सक्तीचें करावें अशी चळवळ चालू आहे याच वेळीं या गोष्टीचा विचार केला तर शिक्षण देण्यांत लागणारे श्रम बरेच वांचतील, असा भरंवसा आहे. नाहीं तर ज्या पांच वर्षेपर्यंत, म्हणजे मुलाच्या ६ ते ११ वया-पर्यंत, मुलांवर सक्ती करावी असें कायद्यानें सांगितलें आहे, त्या ५ वर्षांत मुलांच्या ४ यत्ता पुऱ्या होण्या-ऐवजीं ३ किंवा २ यत्ताच पुऱ्या होतील. यामुळें महाराष्ट्राचें केवढें नुकसान होईल हें थोड्या विचारा-अंतीं कळून येण्यासारखें आहे. आणखी एक लक्षांत ठेवण्याजोगा ल्हानसा मुद्दा आहे कीं, सध्यां जोंपर्यंत साक्षरता कमी आहे तोंपर्यंतच ही सुधारणा घडवून आणण्यास बराच कमी विरोध होईल. परंतु सक्तीच्या शिक्षणानें बहुजनसमाज साक्षर झाल्यावर ही सुधारणा घडवून आणणें झाल्यास विरोध फार मोठ्या प्रमाणांत होईल. ह्या सर्व गोष्टींचा विचार करून हरएक शिक्षि-तान ह्या गोष्टीचा विचार पूर्वग्रह व आग्रह सोडून करावा, अशी आग्रहाची विनंती आहे.

---

# ज्ञानेश्वरी-उपमा.

[ ११४ पृष्ठावरून पुढें चालू. ]

तेथ उत्तीर्ण होईल प्राणें। परी ते कमळदळ चिरूं नेणें। तैसें कठिण कोंवळेपणें। स्नेह देखा ॥ २०२ ॥

जैसा उद्यानामाजी अनळु। संचाला देखोनि प्रबळु। मग क्षणुभरी कोकिळु। स्थिर नव्हे ॥ २३० ॥ कासकर्दम सरोवरु। अवलोकुनी चकोरु। न सेवितु अव्हेरु। करूनि निघे॥२३१॥

हें ऐसें कैसें करावें। जे आपुले आपण मारावें। जाणत जाणताचि सेवावें। काळकूट ॥ २३७॥ हा जी मार्गीं चालतां। पुढां सिंह जाला अवचिता। तो तव चुकविर्ता। लाभु आथी ॥ २३८ ॥ असता अकाशु सांडावा। मग अंधकूप आश्रावा। तरी तेथ कवणु देवा। लाभ सांग ॥२३९॥ कां समोर आगी देखौनी। ... नेणें ...नी। तरी क्षणा एका

जैसें काष्ठें काष्ठ मथिजे। तेथ वन्हि एक उपजे। तेणें काष्ठजात जाळिजे। प्रज्वळ-लेनि ॥ २४३ ॥

असता दीपु दवडिजे। मग अंधकारी राहा-टिजे। तरी उजूचि आडळिजे। जयांपरी॥२४७॥

जैसीं चोहटांचिये बळी। पावती सैरा काउळीं। तैसीं महापापें कुळीं। प्रवेशती॥२५१॥

जैसा नखाग्रीं व्याळु लागे। तो शिखांत व्यापी वेगें। तेवी आब्रह्म कुळ अवघें। आव्ल-विजे ॥ २५६ ॥

जैसा घरीं आपुला। वानिवसें अग्नि लागला। तो आणिकांही प्रज्वाळिला। जाळूनि घाली ॥ २५८ ॥

जैसा राजकुमरु पदच्युतु। सर्वथा होय उपहतु। कां रवि राहुग्रस्तु। प्रभाहीनु ॥ २७०॥ ... महासिद्धिसंभ्रमें। जिंतला तापसु ... कळूनि कामें। दीन कीजे ॥ २७१ ॥

